# नवभारत



किंमत १ रुपया

ऑगस्ट १९४८

अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**

**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.

२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.

३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.

४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






# वर्गणीदारांस सूचना

(१) 'नवभारत'चा अंक दरमहा ५ तारखेच्या आंत नियमितपणें काळजीपूर्वक पोस्टांत टाकला जातो. वर्गणीदारांस जर आपला अंक १० तारखेपर्यंत मिळाला नाहीं तर त्यांनीं प्रथम स्थानिक पोस्ट ऑफिसांत चौकशी करून नंतर आमचेकडे लिहावें. अंक शिल्लक असला तरच पाठविला जाईल. अंक न मिळाल्याबद्दल १५ तारखेनंतर येणाऱ्या तक्रारीस उत्तर दिलें जाणार नाहीं.

(२) पत्रव्यवहार करतांना नेहमीं अनुक्रम-नंबर लिहावा. 'नवभारत' कचेरीतून दरमहा जो अंक रवाना होतो त्यावर पत्त्याच्या वरच्या बाजूस डाव्या हाताला अनुक्रम-नंबर लिहिलेला असतो.

(३) पत्ता बदलावयाचा असल्यास त्याचद्दलची सूचना कचेरीस २५ तारखे-पूर्वी मिळाली पाहिजे. त्यानंतर सूचना-पत्र आल्यास त्याची अंमलबजावणी त्याच महिन्यांत न होतां पुढील महिन्यापासून केली जाईल.

(४) 'नवभारत'च्या कोणत्याहि एजंटास वर्गणी वसूल करण्याचा अधिकार नाहीं. त्यामुळें कचेरी व वर्गणीदार या दोघांनाहि त्रास होतो व विलंब लागतो. म्हणून वर्गणी नेहमीं कचेरीकडे खालील पत्त्यावर पाठविण्याची कृपा करावी.

व्यवस्थापक
**'नवभारत'**,
२१९ शिवाजीनगर, पुणें ५.

---

# एजन्सीबाबत खुलासा

'नवभारत' हें एक उच्च दर्जाचें, वैशिष्ट्यपूर्ण मासिक मराठींत आहे, असा अभिप्राय अनेक वृत्तपत्रांनीं दिलेला आहे. अशा तऱ्हेच्या मासिकाचा प्रसार जास्तींत जास्त व्हावा यासाठीं ठिकठिकाणीं एजन्टस् नेमण्याची योजना आम्हीं तयार केलेली आहे. एजन्सीचे साधारण नियम पुढें देत आहे. तपशीलवार नियमांची मागणी कचेरीकडे केल्यास ते पाठविले जातील.

(१) विक्रेत्यानें कमींत कमी चार अंक घ्यावेत. अंक न खपल्यास परत घेतले जाणार नाहींत.
(२) डिपॉझिट म्हणून कमींत कमी दहा रुपये आमचेकडे जमा ठेवावेत.
(३) पंचवीस अंकांपेक्षां जास्त मागणी असल्यास एजंटास एक प्रत दिली जाते.

व्यवस्थापक
**'नवभारत'**
२१९ शिवाजीनगर, पुणें ५.

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त-मंडळाचें मासिक

# नवभारत

वर्ष पहिलें, अंक अकरावा ऑगस्ट १९४८

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर | आचार्य स. ज. भागवत

श्री. हरि कृष्ण मोहनी | प्रो. वि. म. बेडेकर (कार्य. संपादक)

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल, अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनीं स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठीं जें आपलें सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेलें असेल, उच्च वातावरणांतील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेनें संगृहीत केलेला असेल, त्याचें दिग्दर्शन हेंच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊं शकतें, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

संचालक व संपादक-मंडळांतील सर्व व्यक्ती यांचेंही सर्व विषयांत मतैक्य आहे, असें नाहीं. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यासंबंधीं सदृश अशा दृष्टिकोनानेंच त्यांना एकत्र आणलें आहे. तथापि प्रत्येकाचें व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होतां विकास व्हावा या दृष्टीनेंच त्यांचें सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ति आपल्या नांवानें प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

---

वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

मुद्रक व प्रकाशक र. ग. जोशी यांनीं हें मासिक विश्वास छापखाना, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापिलें आणि नवभारत कचेरी, २१९ शिवाजीनगर, पुणें ५ येथें सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां प्रसिद्ध केलें.

अनुक्रमणिका

# नवभारत, ऑगस्ट १९४८

## या अंकांतील लेखक

१ प्रा. अ. रा. कामत एम्. एस्सी. (पुणें)—फर्ग्युसन कॉलेजमध्यें गणित विषयाचे प्राध्यापक. 'सोव्हिएट शिक्षणपद्धति' 'सोव्हिएट आर्थिक नियोजन' या ग्रंथांचे लेखक

२ श्री. त्र्यं. सी. कारखानीस (पुणें)—'महाराष्ट्र नाटक मंडळी'च्या संस्थापकांपैकीं एक असून त्यांनीं मंडळी १५ वर्षें चालविली व पुढें तेथून निवृत्त झाले. 'राजाचें बंड', 'स्वैरिणी' या नाटकांचे कर्ते, नाट्यविषयावरील व्यासंगी लेखक.

३ आचार्य स. ज. भागवत (पुणें)—शिक्षणशास्त्रज्ञ. 'जीवन आणि साहित्य', 'जीवनशिक्षण' इत्यादि ग्रंथांचे लेखक. 'नवभारता'चे एक संपादक.

४ डॉ. वि. भि. कोलते (नागपूर)—नागपूर महाविद्यालयांत (मॉरिस कॉलेजमध्यें) मराठी विषयाचे प्राध्यापक, महानुभावीय वाङ्मयाचे एक व्यासंगी अधिकारी पंडित. 'लव्हाळी,' 'महानुभाव तत्त्वज्ञान' 'मराठी दीपिका' 'सोडाचिठ्ठी' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

५ श्री. शं. वि. ठकार (पुणें)—एक निष्ठावंत कार्यकर्ते. त्यांनीं पश्चिम खानदेशांत खादीकार्य, ग्रामसेवा व भिल्लसेवा पंचवीस वर्षें केली. हल्लीं ते मुंबई इलाखा ग्रामोद्योगसमितीच्या महाराष्ट्र विभागाचे सहसंघटक आहेत. त्यांचीं कांहीं प्रकाशित पुस्तकें: 'भिल्ल साधु गुलामहाराज यांचें चरित्र व कार्य,' 'ख्रिस्तधर्मीयांस गांधींचें आव्हान' (अनुवादग्रंथ).

६ दि. ब. राजरत्न बा. वि. जोशी बी. ए., एल्. एल्. बी. (बडोदें)— 'विवाहितांचें नंदनवन,' 'अविवाहितांचे प्रश्न' 'जन्माचा बन्दिवास' वैषयिक जीवन' इत्यादि पुस्तकांचे लेखक

७ आचार्य वि. प्र. लिमये. (पुणें)— टिळक महाराष्ट्र विद्यापीठांत संस्कृत व इंग्रजी या भाषांचे माजी अध्यापक, 'अल्बेरुणीची गीता व इतर निबंध' 'प्रांतिक स्वराज्य (?) इत्यादि पुस्तकांचे लेखक--या अंकांतील त्यांचा संपरीक्षणात्मक लेख हा लेखांक पहिला असून राहिलेला दुसरा पुढील अंकीं येईल.

८ प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर (पुणें)—डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट ॲन्ड रिसर्च इन्स्टिट्यूट या संस्थेंत मराठा इतिहासाचे प्राध्यापक. 'Panipat. : 1761' 'शेजवलकरांचे लेख (भाग १ ला)' या ग्रंथांचे लेखक.

९ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (वाई)—धर्मकोशाचे मुख्य संपादक. 'हिंदुधर्मसमीक्षा', 'जडवाद' इत्यादि ग्रंथांचे लेखक.

१० प्रा. प्रभाकर माचवे (उज्जयिनी)—माधव कॉलेजमध्यें तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक. हिंदी साहित्य व संस्कृति या विषयांचे व्यासंगी अभ्यासू लेखक.

११ प्रा वि. ब. आठवले M.Sc. F. R. C. S. (पुणें)— नाशिक येथील कॉलेजमधील भूगोल व गणित या विषयांचे माजी प्राध्यापक. त्यांचे महाभारतावरील संशोधनाविषयक लेख इंग्रजी व मराठी नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले आहेत.

१२ श्री. गो. रा. दोडके बी. ए. (नागपूर)— यांचे निबंध व कथा मराठी नियतकालिकांतून येत असतात.

# मार्क्सवादाचें एक शतक

प्रा. अ. रा. कामत

" साम्यवाद्यांना ( कम्युनिस्टांना ) आपलीं मतें आणि उद्दिष्टें लपवून ठेवण्याचा तिटकारा आहे. सध्यांची सबंध समाजव्यवस्था जबरदस्तीनें उलथून टाकल्यानेंच आपले उद्देश तडीस जाणार आहेत असें ते उघडपणें जाहीर करीत आहेत. साम्यवादी (कम्युनिस्ट) क्रांति होणार या भीतीनें सत्ताधारी वर्गाचा थरकांप होत आहे; होईना का ! कामगारांजवळ गमावण्यासारखें असें एक बेड्या सोडून दुसरें काय आहे ! उलट कमावण्यासारखें मात्र सर्व कांहीं आहे; दुनियेचें राज्य कमावण्यासारखें आहे.

" सर्व देशांतील कामगारांनो, एक व्हा. "

(कम्युनिस्ट–जाहीरनामा)

*भांडवलदारी समाजव्यवस्था उलथून पाडण्यासाठीं मार्क्सनें जगांतील कामगारांना उद्देशून ही स्फूर्तिदायक घोषणा केली, त्यास आज शंभर वर्षे पुरीं झालीं. कम्युनिस्ट–जाहीरनाम्याची ही हांक म्हणजे मार्क्सवादी चळवळीची केवळ सुरुवात होती. भांडवली अर्थव्यवस्था त्या वेळीं ऐन जोमांत होती. भांडवलविरोधी लढ्याचें सत्य स्वरूप जगासमोर अद्याप शास्त्रशुद्धपणें मांडण्यांत आलेलें नव्हतें आणि कामगार–संघटनाहि विस्कळित होत्या. मार्क्सच्या या हांकेला त्या वेळीं फार थोड्या लोकांनीं साद दिली.

या शंभर वर्षांत परिस्थिति पार पालटली आहे. भांडवली अर्थव्यवस्थेचा त्या वेळचा जोम साफ लयाला गेला आहे. आज तिला मक्तेदारी वर्चस्वानें पुरेपूर ग्रासलें असून ती मोडकळीस आल्याचें स्पष्ट दिसत आहे. भांडवली अर्थव्यवस्थेचे अंतर्विरोध आज अगदीं कळसाला पोंचले आहेत.

तीस वर्षांपूर्वी या मरणोन्मुख समाजव्यवस्थेला जोराचा हादरा बसला आणि मार्क्सवादी बोल्शेविक पक्षाच्या नेतृत्वाखालीं जगाचा एकषष्ठांश भाग भांडवली चौकट फोडून बाहेर निघाला. या तीस वर्षांत सोव्हिएट समाजवादी संघराज्यानें अपूर्व प्रगति केली. जगांत आज जीं दोन सर्वांत बलाढ्य राष्ट्रें आहेत त्यांपैकीं एक राष्ट्र सोव्हिएट यूनियन हें आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर पूर्व युरोपांतील देशांत लोकक्रांत्या होऊन प्रत्येक ठिकाणीं ' नवी लोकसत्ता' स्थापन झाली आहे. कम्युनिस्ट पक्षाच्या नेतृत्वाखालीं हे सर्व देश समाजवादाची वाट चालत आहेत. उत्तर चीनमधील चौदा कोटी जनता मार्क्सवादाच्या निशाणाखालीं लोकशाही स्वातंत्र्याचा लढा लढत आहे. जगांतील कामगार–चळवळ जागी झाली असून साडेसात कोटी संघटित कामगार जागतिक कामगार–संघटनेत (वर्ल्ड–फेडरेशन)मध्यें सामील झाले आहेत. निरनिराळ्या पंचावन्न राष्ट्रांत मार्क्सवादी ( कम्युनिस्ट ) पक्ष कार्य करीत असून त्यांची एकूण सभासदसंख्या दोन कोटींहून अधिक आहे. यापुढील प्रगति भांडवली तऱ्हेनें होणें शक्य नाहीं. भांडवली अर्थव्यवस्था जगाला घोर आर्थिक अरिष्टाकडे आणि तिसऱ्या महायुद्धाच्या खाईत लोटीत आहे, याची दिवसेंदिवस अधिकाधिक खात्री पटत चालल्यामुळें जगांतील दलित जनता "चिरकालीन शांतता आणि खरी जनतेची लोकशाही" ( फॉर दि लास्टिंग पीस, फॉर पीपल्स डेमॉक्रसी ) यांसाठीं मार्क्स–वादाच्या झेंड्याखालीं गोळा होत असल्याचें दृश्य आज दिसतें. सोव्हिएट परराष्ट्रमंत्री मोलोटोव यांनीं

*प्रा. अ. रा. कामत यांचा या विषयावरील हा पहिला लेखांक असून याच विषयावरील त्यांचा दुसरा व शेवटचा लेखांक ' नवभारता 'च्या पुढील अंकीं येईल.– का. सं.








म्हटल्याप्रमाणें "आपण अशा युगांत वावरत आहों कीं या काळांत सर्व मार्ग साम्यवादा (कम्युनिझम)-कडे चालले आहेत."

गेल्या शंभर वर्षांत मार्क्सवादानें किती विलक्षण प्रगति केली आहे ही!

• • • • •

## १ कम्युनिस्ट–जाहीरनाम्यापूर्वी

मार्क्सवादी चळवळीचें समालोचन करावयाचें म्हणजे एक प्रकारें या एका शतकांतील कामगार–चळवळीचा, क्रांतिकारक समाजवादी चळवळीचा आढावा घेतला पाहिजे.

युरोपमध्यें १८४८ सालचीं क्रांतिकारक आंदोलनें उफाळलीं तत्पूर्वी कांहीं थोडे दिवस कम्युनिस्ट–जाहीरनामा तयार झाला. हा जाहीरनामा मार्क्सवादी चळवळीचा पहिला महत्त्वाचा टप्पा समजला जातो. मार्क्सवादी विचारसरणी जाहीरनाम्याच्या स्वरूपांत प्रथमच पूर्ण स्वरूपांत आणि पद्धतशीरपणें मांडली गेली; आणि अद्यापिहि कम्युनिस्ट–जाहीरनामा हेंच मार्क्सवादाचें सर्वांत उत्तम व आटोपशीर विवेचन आहे असें मानण्यांत येतें.

ऐतिहासिक दृष्ट्या या जाहीरनाम्याला कसें क्रांतिकारक महत्त्व आहे हें ध्यानांत येण्याकरितां १८४८पूर्वीच्या काळाकडे दृष्टिक्षेप टाकणें जरूर आहे. मार्क्सच्या आधीं समाजवादी विचारसरणि अथवा कामगार–चळवळ नव्हती असें मुळींच नाहीं. फ्रेंच राज्यक्रांतीनंतर युरोपांतील निरनिराळ्या देशांत सरंजामदारी युग संपून भांडवलदारी युगास प्रारंभ झाला. इंग्लंडमध्यें ही क्रांति आधींच घडून आली होती. भांडवली अर्थव्यवस्थेची प्रगति होऊं लागली तशी कामगारवर्गांतहि जागृति होणें तद्वत्च स्वतःच्या हक्कांसाठीं एकत्र येण्यास सुरुवात होणें अपरिहार्य होतें. अशा रीतीनें कामगार–चळवळ मूळ धरूं लागली. त्याचबरोबर समाजवादी तत्त्वज्ञानहि या ना त्या स्वरूपांत मांडण्यांत येऊं लागलें. कम्युनिस्ट–जाहीरनामा हें आधींच्या चाळीसपन्नास वर्षांतील कामगार–चळवळी आणि समाजवादी विचारप्रवाह यांचें ऐतिहासिक पर्यवसान होतें. म्हणून प्रथम त्यांचा विचार करणें योग्य ठरेल.

### मार्क्सपूर्वीची कामगारचळवळ व समाजवाद

कम्युनिस्ट–जाहीरनामा प्रसिद्ध होण्यापूर्वी समाजवादी चळवळ कोणत्या अवस्थेंत होती? याचें उत्तर एंगल्सच्या पुढील उताऱ्यांत मिळतें:—

"१८४७ सालीं दोन प्रकारचे लोक आपणांस **समाजवादी (सोशालिस्ट)** म्हणवून घेत असत. एक प्रकार अशांचा कीं ज्यांचा समाजवाद मनोराज्यवादी होता. ब्रिटनमधील ओवेनचे अनुयायी आणि फ्रान्समधील फूरियेरचे अनुयायी या प्रकारचे होते. ...... भांडवल आणि फायदा यांस यत्किंचित् धक्का न लावतां कांहीं तरी भरमसाट उपाय सुचविणारे कित्येक "वैदू" हे दुसऱ्या प्रकारचे समाजवादी होते. या दोन्ही गटांत कामगारचळवळींत सामील नसलेल्यांचाच भरणा होता, आणि "सुसंस्कृत" (वरिष्ठ) वर्गाचा आपणांस पाठिंबा मिळेल अशी आशा त्यांस वाटत असे. केवळ राजकीय सुधारणा पुरेशा नाहींत, तर सर्वंच समाजव्यवस्थेंतच संपूर्ण बदल झाला पाहिजे अशी कामगारवर्गांतील एका विभागाची खात्री पटली होती; हा विभाग आपणास **साम्यवादी (कम्युनिस्ट)** म्हणवून घेत असे. ... १८४७ सालीं समाजवादी चळवळ (सोशालिझम्) ही भांडवलदार–पुरस्कृत चळवळ होती; उलट पक्षीं, साम्यवादी चळवळ (कम्युनिझम्) कामगार–वर्गाची होती. समाजवादी चळवळीला निदान युरोपांत तरी, वरिष्ठ वर्गांत मान्यता मिळाली होती; पण साम्यवाद्यांची स्थिति याच्या अगदीं उलट होती. **कामगार–वर्गाला दास्यमुक्त करण्याचें कार्य खुद्द कामगार–वर्गाचेंच आहे** अशी त्या वेळीं सुद्धां आमची (मार्क्स व एंगल्स-यांची) श्रद्धा असल्यामुळें वरील दोन शब्दांपैकीं कोणता शब्द (या जाहीरनाम्यास उद्देशून) लावावा याविषयीं आमच्या मनांत बिलकुल संदेह नव्हता."

—[एंगल्सनें १८९० सालीं क. जाहीरनाम्यास लिहिलेली प्रस्तावना.]

कामगारवर्गीय आणि त्या वर्गाशीं संबंध नसलेला असे दोन स्थूल समाजवादी विचार–प्रवाह त्या वेळींहि होते. यांपैकीं कामगारवर्गीय चळवळींत मार्क्स सामील झाला; कम्युनिस्ट हें विशेषण त्यानें जाहीरनाम्याला बुद्धिपुरःसर लावलें होतें. इंग्लंडमधील

चार्टिस्टांना त्यानें पाठिंबा दिला, त्याचें कारणहि हेंच होतें. ब्रिटिश समाजवादी विचारवंत ओवेन यानें चार्टिस्ट चळवळीला विरोध केला होता हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. शंभर वर्षांनंतर आजहि समाजवादी चळवळींत हे दोन विभाग स्पष्टपणें दिसतात; हिंदुस्तान देश सुद्धां याला अपवाद नाहीं. समाजवादी क्रांतीचा खरा आधार कामगार–वर्ग हाच आहे असें मानणारे कम्युनिस्ट आणि अशी स्पष्ट भूमिका न घेणारे इतर समाजवादी असे दोन भाग आपल्याकडील समाज-वादाच्या पुरस्कर्त्यांमध्येंहि ठळकपणें दिसून येतात.

'कामगारवर्ग हाच खरोखरी क्रांतिकारक वर्ग आहे' या तत्त्वावर मार्क्सनें भर दिला, तो केवळ भावना-त्मक रीतीनें किंवा अंधळेपणानें दिलेला नव्हता. त्याच्यामागें इतिहासाविषयीं शास्त्रशुद्ध विचारांची बैठक होती. समाजवादाविषयींची मार्क्सवादी भूमिका आधींच्या समाजवादी विचारवंतांच्या भूमिकेहून मूलतःच वेगळी होती.

## मनोराज्यी समाजवाद

अठरावें शतक संपण्यापूर्वी युरोपांतील कित्येक देशांत भांडवली उत्पादन–पद्धति आणि समाज–व्यवस्था रूढ होऊं लागली होती. या नव्या समाज–व्यवस्थेंत सर्वत्र सुखाचें साम्राज्य पसरेल ही कल्पना अगदीं सुरुवातीपासून फोल ठरूं लागली. दारिद्र्य आणि दैन्य नव्या स्वरूपांत दिसूं लागलीं; एक नवा दलित वर्ग, कामगारवर्ग निर्माण झाला. कामगार–वर्गाची अमानुष पिळणूक तद्वतच भीषण परिस्थिति अधिकाधिक तीव्रपणें दिसून येऊं लागली तेव्हां या नव्या समाजव्यवस्थेविषयीं असंतोष व्यक्त करण्यांत येऊं लागला आणि यामधून समाजवादी विचार–सरणि उदयास आली. समाजवादाच्या आद्य पुर-स्कर्त्यांमध्यें इंग्लंडमधील ओवेन आणि फ्रान्समधील सेंट सायमन व फूरियेर यांची प्रामुख्यानें गणना होते. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभास या विचार–वंतांनीं आपले विचार मांडण्यास सुरुवात केली होती.

भांडवली समाजांतील विषमता तद्वतच अन्याय त्यांना दिसत होते. पण ही विषमता आणि हे अन्याय मुख्यतः अज्ञानमूलक आहेत. ते दूर करण्यासाठीं मनुष्याच्या बुद्धीला, कल्पना-शक्तीला आवाहन केलें पाहिजे. सध्यांच्या समाज–व्यवस्थेंतील दोष ज्यांत नाहींसे होतील अशी एक नवी समाजव्यवस्था **कल्पिली** पाहिजे आणि तिचा प्रचार करून व नव्या तऱ्हेच्या नमुनेदार वसाहती स्थापून प्रत्यक्ष उदाहरणांनीं ही नवी समाजव्यवस्था निर्माण केली पाहिजे, असा त्यांचा म्हणण्याचा मथितार्थ होता. ओवेन, फूरियेर व सेंट सायमन यांच्या नव्या समाजपद्धतीविषयींच्या कल्पना भिन्न असल्या आणि त्यांचा तपशील वेगवेगळा असला तरी सामान्यतः त्यांची विचारसरणि वर लिहिल्या-प्रमाणें एकाच तऱ्हेची होती. समाजवाद म्हणजे शाश्वत सत्यावर आधारलेली समाजपद्धति आणि ती सर्वांना (धनिक भांडवलदारांना सुद्धां) केवळ प्रतीत होण्याचाच अवकाश कीं मग ती सर्वत्र प्रत्यक्षांत अवतरेल अशी त्यांची श्रद्धा होती.

त्या वेळीं भांडवली उत्पादन–पद्धति अद्याप सुरुवातीच्या अवस्थेंत होती. वडी कारखानदारी अद्याप रूढ झाली नव्हती. त्यामुळें कामगार–वर्गाला आपल्या स्वतंत्र अस्तित्वाची जाणीव होऊं लागली नव्हती.

स्वतःच्या उद्धारासाठीं संघटितपणें झगडण्याइतकी ताकद त्याच्या अंगीं आलेली नव्हती. अशा परि-स्थितींत नवी समाजरचना आणण्याची भाषा इतरां-कडून निघावी आणि या समाजवादी विचारवंतांना कामगार–वर्गाची भावी काळांतील भूमिका आकलन न व्हावी ही गोष्ट स्वाभाविकच समजली पाहिजे. सामाजिक अन्याय आणि विषमता यांवर त्यांनीं प्रखर टीका केली, भांडवली समाजांतील ढोंगांवर त्यांनीं विदारक प्रकाश पाडला; पण या समाजव्यव-स्थेचा नाश आणि नव्या समाजपद्धतीचा उदय यांचीं बीजें स्वतःभोंवतालच्या परिस्थितींतच आहेत हें त्यांस दिसलें नाहीं. याविषयीं त्यांची सर्व भिस्त कल्पनाशक्तीवर होती. म्हणूनच एंगल्सनें मार्क्सपूर्वींच्या समाजवादी विचारवंतांना **समाज-वादाचीं मनोराज्यें रचणारे विचारवंत** अथवा **मनोराज्यी समाजवादी** असें नांव दिलें आहे.

मार्क्सपूर्वींची समाजवादी विचारसरणि मुख्यतः अशा प्रकारची होती. कम्युनिस्ट–जाहीरनाम्यानंतर मार्क्सवादाच्या स्वरूपांत शास्त्रीय समाजवाद पुढें










येऊं लागला आणि मनोराज्यी समाजवाद मागें पडूं लागला. पण आज शंभर वर्षांनंतरहि पूर्वीच्या विचारसरणीचा प्रभाव सर्वस्वीं नाहींसा झालेला नाहीं. स्वतःला समाजवादी म्हणविणाऱ्या आणि न म्हणविणाऱ्या अशा दोन्ही तऱ्हेच्या लोकांवर थोड्याबहुत प्रमाणांत मनोराज्यी समाजवादाची छाप दिसून येते. उदाहरणार्थ, धनिकवर्ग नष्ट करण्याची आवश्यकता नाहीं, त्यांनीं विश्वस्त म्हणून राहावें, हें गांधीवादांतील तत्त्व सेंट सायमननें सव्वाशें वर्षांपूर्वीच प्रतिपादिलेलें आहे. पातळ, भ्रष्ट, विकृत आणि ढोंगी या सर्व स्वरूपांत या जुन्या समाजवादी विचारवंतांचे विचार आजहि मांडले जात आहेत. ते मांडणाऱ्या लोकांत जसे मनोराज्यें रचणारे भूतदयावादी लोक आहेत तसे समाजवादाची भाषा बोलल्याशिवाय गत्यंतर नाहीं म्हणून धनिकांचे प्रस्थापित हितसंबंध टिकविण्यासाठीं समाजवादाचें कातडें पांघरणारे ढोंगी लोकहि आहेत.

सव्वाशें वर्षांपूर्वी सेंट सायमन प्रभृति समाजवादी विचारवंतांनीं भांडवली समाजावर जबरदस्त कोरडे हाणून नव्या समाजपद्धतीची घोषणा केली; त्या काळीं ही त्यांची कामगिरी प्रगतिपर अशीच होती. पण आज धनिकशाही टिकविण्याच्या हेतूनें कामगारवर्गाला भुलवून वर्गयुद्धाच्या भूमिकेपासून त्याला परावृत्त करण्यासाठीं आणि अशा प्रकारें समाजवादी क्रांतीचे पाय मागें ओढण्यासाठीं त्याच तत्त्वांचा उच्चार निरनिराळ्या स्वरूपांत होत आहे.

## शास्त्रशुद्ध समाजवाद—मार्क्सवाद

भांडवलदारी युगाच्या सुरुवातीस कामगार-वर्ग विस्कळित आणि संख्याबलानें लहान होता. पण ही परिस्थिति फार काळ टिकली नाहीं. युरोपांतील ज्या राष्ट्रांत बडी कारखानदारी झपाट्यानें वाढीस लागली, तेथें मालकशाहीच्या जुलुमाविरुद्ध झगडण्यासाठीं कामगार संघटित आणि वर्गजागृत होणें अपरिहार्य होतें. संप-लढे अधिक संघटित आणि निकराचे होऊं लागले आणि ते चिरडण्यासाठीं प्रस्थापित सरकार भांडवलदारांच्या वतीनें अमानुष दडपशाही करतें हेंहि दिसून येऊं लागलें. पिळणारे धनिक भांडवलदार आणि पिळले जाणारे दलित कामगार असे दोन वर्ग उघडपणें दृष्टोत्पत्तीस येऊं लागले. १८३१ सालीं फ्रान्समधील लियाँ शहरीं कामगारांनीं बंड केलें आणि १८४० सालच्या सुमारास मूलभूत हक्कांची सनद मिळविण्यासाठीं इंग्लंडमधील कामगारांनीं देशव्यापी चार्टिस्ट चळवळ उभारली.

वर्गलढे तीव्र होऊं लागतांच मालक आणि मजूर यांचे हितसंबंध एकच आहेत अशी घोषणा करणाऱ्या आणि खुल्या स्पर्धेमुळें सर्वत्र आबादीआबाद होणार असे गोडवे गाणाऱ्या तथाकथित भांडवली अर्थशास्त्रावरील मुलामा उडून गेला आणि पिळणुकीचें व वर्गकलहाचें सत्य उघडें पडलें. आतां समाजवादाला कल्पनेच्या साम्राज्यांतून वास्तव जगांत उतरणें भाग होतें. भांडवली समाजपद्धतीच्या मुळाशीं असलेली उत्पादनपद्धति, उत्पादन-संबंध, मालकशाही आणि कामगारवर्ग यांमधील हितविरोध त्याचप्रमाणें भांडवलदारी पद्धतीचें इतिहासांतील स्थान, तिची उत्पत्ति, तिचा विकास आणि तिचा लय या सर्व गोष्टींचा विचार होणें अपरिहार्य झालें. हें ऐतिहासिक कार्य मार्क्सनें पार पाडलें; आणि यांतच त्याचा द्रष्टेपणा दिसून येतो. मार्क्सनें ऐतिहासिक भौतिकवादाचें तत्त्व पुढें मांडलें आणि भांडवली अर्थोत्पादनामागें दडलेलें वाढाव्याचें—सर्‌प्लस व्हॅल्यूचें तत्त्व शोधून काढून कामगारांच्या पिळणुकीचें कारण उघड केलें. भांडवलशाहीच्या नाशाचीं बीजें कामगार-वर्गाच्या रूपानें तिच्यांतच समाविष्ट आहेत हें त्यानें दाखवून दिलें. मार्क्सच्या हातीं समाजवादाचें मनोराज्यमय स्वरूप पार बदलून त्यास शास्त्राचें, मार्क्सवादाचें स्वरूप प्राप्त झालें.

कम्युनिस्ट-जाहीरनामा लिहिला जाण्यापूर्वी तीन चार वर्षें मार्क्स आणि एंगल्स यांनीं शास्त्रीय समाजवादाची तात्त्विक बैठक घडविली होती. त्यांच्याच प्रेरणेनें 'फेडरेशन ऑफ् दि जस्ट' या संस्थेंत सामील असलेल्या वेगवेगळ्या कम्युनिस्ट गटांची पुनर्रचना होऊन १८४७ सालीं कम्युनिस्ट-लीग स्थापन झाली; आणि तिच्या दुसऱ्या अधिवेशनांतील एका ठरावाअन्वयें मार्क्सनें १८४८ सालच्या फेब्रुवारी महिन्यांत "**कम्युनिस्ट पक्षाचा जाहीरनामा**" तयार केला. अशा प्रकारें मार्क्सवाद अथवा शास्त्रीय समाजवाद पूर्ण स्वरूपांत आणि जोरदार भाषेंत जगापुढें आला. मार्क्सवादी चळ-










वळींनें पहिला महत्त्वाचा टप्पा गांठला. मार्क्सवादाचें हें पहिलें पाऊल म्हणजे आधींच्या अर्धशतकांतील कामगार–चळवळीची आणि समाजवादी विचारांची क्रमप्राप्त परिणति होती हें वरील आढाव्यावरून स्पष्ट होईल.

## जाहीरनाम्याची शिकवण

मार्क्सनें जाहीरनाम्यांतून कोणतीं तत्त्वें जगासमोर मांडलीं? "प्रत्येक ऐतिहासिक कालखंडांत उत्पादनाची पद्धति आणि तिच्यापासून अपरिहार्यपणें उद्भवणारें सामाजिक जीवन हीं पायाभूत असून त्यांवर त्या कालखंडांच्या राजकीय आणि बौद्धिक इतिहासाची उभारणी होते; म्हणून (जमिनीची सामायिक मालकी नष्ट झाल्यानंतरच्या काळांतील) मानवसमाजाचा सर्व इतिहास म्हणजे वर्गकलहाचा इतिहास आहे; समाजाच्या उत्क्रांतीच्या वेगवेगळ्या अवस्थांतील शोषित आणि शोषणारे, दलित वर्ग आणि सत्ताधारी वर्ग यांमध्यें हा वर्गकलह सतत चालू असतो; आज हा लढा अशा अवस्थेप्रत येऊन पोंचला आहे कीं शोषित आणि दलित असा कामगारवर्ग शोषणाऱ्या सत्ताधारी भांडवलदार वर्गाच्या वर्चस्वाखालून मुक्त होतांना केवळ स्वतःचीच नव्हे तर स्वतःबरोबर सर्व समाजाचीहि शोषण, जुलूम आणि वर्गकलह यांपासून मुक्तता करील."

—[एंगल्सनें १८८३ सालीं जाहीरनाम्याला लिहिलेली प्रस्तावना.]

हा जाहीरनामा म्हणजे केवळ कम्युनिस्ट–लीगच्या कार्यक्रमाची घोषणा नाहीं, तर मानवी इतिहासाचें आणि भांडवली अर्थोत्पादनाचें सूक्ष्म अवलोकन करून त्यांचें शास्त्रशुद्ध विवेचन त्यामध्यें केलें आहे; त्याचबरोबर कामगार–वर्गाला कामगार–क्रांतीचा मार्ग दाखवून दिलेला आहे. "शक्य तों परिपूर्ण अशा सामाजिक ध्येयाची कल्पनामय उभारणी करणें" हा या जाहीरनाम्याचा उद्देश नाहीं, तर "कामगार–वर्ग ज्या लढ्यांत उतरला आहे त्या लढ्याचें खरें स्वरूप व तो लढा ज्या परिस्थितींत लढला जात आहे ती परिस्थिति उकलून त्यांस अनुसरून या लढ्याचीं स्थूल उद्दिष्टें" या जाहीरनाम्यांत ग्रथित केलीं आहेत [एंगल्स]. क्रांतिकारक तात्त्विक विवेचन आणि क्रांतिकारक आचार या दोन्ही गोष्टी त्यामध्यें एकवटल्या आहेत. जाहीरनाम्यानें दलित कामगार–वर्गाला जसा आशेचा संदेश दिला तसेंच कामगार–क्रांतीच्या लढ्याचें रणशिंगहि फुंकलें. गतेतिहास आणि सद्यःपरिस्थिति यांचें विश्लेषण करून मार्क्सनें मार्क्सवादाची शास्त्रशुद्ध उभारणी केली. जाहिरनाम्याच्या स्वरूपांत भविष्यकाळावर रोखलेली ही दुर्बीण कामगारवर्गाच्या हातीं देऊन "पाहा, इतिहासाचा ओघ तुमच्या बाजूचा आहे, तुमचे सहकारी भाई सर्व जगभर आहेत, दुनियेचें राज्य भविष्यकाळांत तुमचें होणार आहे" अशी ग्वाही मार्क्सनें कामगार–वर्गाला दिली आणि सध्यांची जुलमी समाजव्यवस्था उलथून टाकण्यासाठीं एकवटण्याची लढाऊ हांक त्याला दिली.

## तीं तत्त्वें आजहि लागू आहेत

हा जाहीरनामा प्रसिद्ध झाल्यास आज शंभर वर्षे लोटलीं असलीं तरी भांडवलदारी आणि कामगार–क्रांति यांविषयीं त्यामध्यें सांगितलेलीं ढोबळ तत्त्वें आजहि तितकींच लागू आहेत. या जाहीरनाम्यानंतर पंचवीस वर्षांनीं (१८७२मध्यें) मार्क्स व एंगल्स नव्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत लिहितातः— "जाहीरनामा लिहिल्यानंतरच्या गेल्या पंचवीस वर्षांत परिस्थिति बदलली असली तरी त्यामध्यें विवेचिलेलीं सामान्य तत्त्वें एकंदरीनें पाहतां आजहि पूर्वीइतकींच बरोबर आहेत."

चाळीस वर्षांनीं (१८८८ सालीं) एंगल्सनें "सामान्य तत्त्वें अद्यापहि लागू" असल्याचें पुनः एकवार बजावलें. १९१७ सालीं, म्हणजे हा जाहीरनामा प्रसिद्ध झाल्यानंतर सत्तर वर्षांनीं, ठिकठिकाणच्या मार्क्सवादी पक्षांनीं कम्युनिस्ट पक्ष असें नांव घेतलें पाहिजे असें प्रतिपादन करतांना लेनिन म्हणतो, "आम्ही मार्क्सवादी आहों आणि कम्युनिस्ट–जाहीरनामा हा आम्ही आधारभूत समजतों अशी घोषणा आपण पुनः एकदां केली पाहिजे." आजहि देशोदेशींचे मार्क्सवादी या जाहीरनाम्यांतील तत्त्वें प्रमाणभूत मानतात. गेल्या शंभर वर्षांत इतिहासाची प्रगति झालीच नाहीं अथवा मार्क्सवादांत भर पडली नाहीं असा मात्र याचा अर्थ नव्हे. खुद्द मार्क्सनें १८७२ सालीं लिहिल्याप्रमाणें "हीं तत्त्वें प्रत्यक्ष व्यवहारांत कशीं







आणावयाची हें अर्थातच त्या त्या वेळच्या आणि त्या त्या देशाच्या ऐतिहासिक परिस्थितीवर अवलंबून राहील." नव्या परिस्थितीचें विश्लेषण करून त्या काळास अनुरूप अशीं नवीं उद्दिष्टें कामगार-चळवळीपुढें ठेवण्याचें काम त्या त्या वेळच्या मार्क्सवाद्यांचें असून लेनिन, स्टॅलिन, टिटो, माव त्से तुंग वगैरे प्रथितयश मार्क्सवाद्यांनीं तें केलें आहे आणि ते अजूनहि करीत आहेत.

शंभर वर्षांपूर्वी ग्रथित केलेलीं तत्त्वें आजतागायत लागू आहेत. आजहि कामगारचळवळीला या जाहीरनाम्यापासून स्फूर्ति मिळते आणि मार्गदर्शन होतें, याचें कारण काय? याचें कारण हेंच कीं मानवसमाजाच्या ऐतिहासिक विकासामागील सत्य त्यांत उकलून दाखविलेलें आहे आणि विशेषतः भांडवलदारी समाजाच्या विकासाचें आणि त्याच्या अंतिम नाशाचें अचूक निदान त्यांत केलेलें आहे. तसेंच भांडवलशाही उलथून पाडून समाजवाद आणण्याचें हें ऐतिहासिक कार्य कामगारवर्गच करणार आहे, अशी स्पष्ट घोषणा त्यांत केलेली आहे. आज भांडवलशाहीचा अंतकाल समीप आला असला तरी हें कार्य कामगार-चळवळीला अद्याप पार पाडावयाचें आहे. या जाहीरनाम्यांत सांगितलेले विचार अद्यापहि तितकेच ताजे आहेत याचें कारण हेंच आहे. लंडन-टाइम्ससारख्या भांडवली वृत्तपत्रालाहि,

"भांडवलदारी समाजव्यवस्थेला गेल्या शंभर वर्षांत अधिकाधिक प्रमाणांत बचावाचें धोरण स्वीकारावें लागलें आहे आणि तिचें भवितव्य अनिर्णीत स्वरूपांत आहे ही गोष्ट फारच थोड्या लोकांना अमान्य होईल. हें तिचें भवितव्य ठरून कांहीं तरी नवी घडी तिच्या जागीं आली नाहीं तोंपर्यंत कम्युनिस्ट-जाहीरनाम्याचें कार्य समाप्त झालें असें म्हणतां येणार नाहीं"

असे उद्गार, अनिच्छेनें का होईना, पण काढावे लागले, यामागील रहस्यहि हेंच आहे. (लंडन टाइम्स, वाङ्मयविषयक पुरवणी, ता. १३ डिसेंबर १९४७).

* * * *

मार्क्सवादाविषयीं १९१३ सालीं लिहितांना लेनिननें १८४८पासूनच्या काळाचे तीन स्थूल कालखंड पाडले आहेत :

(१) १८४८ सालच्या युरोपमधील क्रांत्यांपासून तों १८७१ सालच्या पॅरिस-कम्यूनीपर्यंत.

(२) पॅरिस-कम्यूनपासून १९०५ सालच्या पहिल्या रशियन क्रांतीपर्यंत.

(३) १९०५पासून पुढें.

## २ सन १८४८ ते पॅरिस-कम्यून (१८७१)

कम्युनिस्ट-जाहीरनामा लिहिला गेला त्या वेळीं युरोपांत सर्वत्र क्रांतीचें वारें भरून राहिलें होतें. भांडवली लोकशाहीसाठीं सरंजामदारी सत्तेविरुद्ध निर्णायक लढ्याला तोंड फुटणार अशीं पूर्वचिन्हें दिसत होतीं. युरोपांतील सिंहासनें भीतीनें कांपूं लागलीं आहेत असा जाहीरनाम्याच्या सुरुवातीस जो उल्लेख आहे, तो या क्रांतिकारक वातावरणास उद्देशून आहे. जाहीरनामा बाहेर पडल्यानंतर कांहीं दिवसांच्या आंतच सर्वत्र क्रांतीची लाट उसळली आणि देशोदेशीं झालेल्या या क्रांत्यांमध्यें जाहीरनाम्यांत सांगितलेले विचार तंतोतंत बरोबर ठरले.

कम्युनिस्ट-जाहीरनामा प्रसिद्ध झाला त्या फेब्रुवारी महिन्यांतच फ्रान्समध्यें राजेशाही कोलमडली आणि पुढें जून महिन्यांत कामगारांनीं ही क्रांति पुढें नेऊन सत्ता काबीज करण्यासाठीं बंड केलें व वरिष्ठ वर्गांनीं कामगारांची अमानुष कत्तल करून तें मोडून काढलें. मार्च महिन्यांत जर्मनींत लोकशाहीसाठीं क्रांतीचा प्रयत्न झाला; पण सुरुवातीच्या चकमकीनंतर भांडवलदार-वर्गानें कच खाल्ली; भांडवलदारांनीं राजेशाही आणि सरंजामदार यांच्याशीं समझौता केला. यानंतर जर्मनीचें एकीकरण होऊन बलाढ्य जर्मन राष्ट्र निर्माण झालें; पण तेथेंहि इंग्लंड-फ्रान्सप्रमाणें भांडवली लोकशाही प्रस्थापित झाली. बिस्मार्कच्या प्रेरणेनें सरदार, लष्करी अधिकारी आणि राजसत्ता यांच्या आधिपत्याखालीं जर्मनीचें एकीकरण घडून आलें. ऑस्ट्रिया आणि इटली येथेंहि क्रांतीचे प्रयत्न झाले, पण त्यांचीहि गत जर्मनीप्रमाणेंच झाली. या सर्व युरोपियन क्रांत्यांमध्यें निरनिराळ्या वर्गांचे खास हितसंबंध आणि त्यांचे परस्परांशीं असलेले संबंध स्पष्टपणें दिसून आले.

"सर्वत्र क्रांतीचा भार कामगार वर्गानेंच उचलला, कामगारांनीच रस्त्यांवर मोर्चे बांधले व क्रांती-










प्रीत्यर्थ प्राणहि वेंचले. सरकार उलथून टाकल्यावर सर्व भांडवली समाजव्यवस्थाच नाहींशी केली पाहिजे असा पक्का निश्चय मात्र एकट्या पॅरिसच्या कामगार-वर्गानेंच धरला होता. शेवटीं क्रांतीचीं फळें मात्र भांडवलदारवर्गाच्या हातीं पडलीं ! इटली, ऑस्ट्रिया, जर्मनी यांसारख्या इतर देशांत भांडवलदारांना राजसत्ता मिळविण्यास साहाय्य करण्यापलीकडे कामगार-वर्गाची मजल गेली नाहीं. ''

—[ एंगल्सनें १८९३ सालीं कम्युनिस्ट-जाहीरनाम्याला लिहिलेली प्रस्तावना. ]

## फ्रेंच क्रांति (१८४८)

फ्रान्समध्यें फेब्रुवारीमधील क्रांतीच्या वेळीं भांडवलदार आणि कामगार परस्परांच्या खांद्याला खांदा लावून लढले. पण भांडवली क्रांति यशस्वी झाली आणि जून महिन्यांत कामगारवर्गानें सामाजिक क्रांतीची घोषणा करून पुढें पाऊल टाकण्याचा प्रयत्न केला; त्याबरोबर भांडवलदार कामगारांविरुद्ध उलटले व या दोन वर्गांचे परस्पर-संबंध स्पष्ट झाले. मार्क्स लिहितो:—

"जूनमधील क्रांतीच्या वेळीं प्रथमच सर्व समाज दुभंग होऊन दोन तट—पॅरिसचा पूर्वभाग आणि पाश्चिमभाग—परस्परांविरुद्ध ठाकले....... फेब्रुवारी-क्रांतीचे वेळीं एकत्र असलेले लोक आतां परस्परांशीं लढत आहेत; अशी घटना यापूर्वी कधींच घडली नव्हती.'' —[ मार्क्स, फ्रान्समधील वर्गलढे. ]

फक्त कामगार-वर्गच समाजवादी क्रांतीचा खरा पुरस्कर्ता असतो आणि समाजक्रांतीचा प्रयत्न होऊं लागला म्हणजे इतर वर्ग कोणती भूमिका घेतात हें जून-क्रांतीच्या वेळीं स्पष्टपणें दिसून आलें.

'' १८४८च्या जून महिन्यांत लोकशाहीचा पुरस्कार करणाऱ्या भांडवलदारांनीं पॅरिसच्या कामगारांची कत्तल केली यावरून ही गोष्ट सिद्ध झाली. फक्त कामगारवर्गच मूलतः समाजवादी असतो. प्रागतिक भांडवलदारांना प्रतिगामी वर्गापेक्षां या कामगार-वर्गाला स्वातंत्र्य मिळेल याचीच शतपटीनें अधिक भीति वाटत होती. या भेदरट प्रागतिकांनीं प्रतिगामी वर्गासमोर लोटांगण घातलें. सरंजामदारीचे अवशेष नष्ट झाले येवढ्यावरच शेतकरीवर्ग समाधान मानून राहिला आणि शांतता—सुव्यवस्थेच्या पाठीराख्यांस त्यानें मदत केली. कामगारांची लोकशाही आणि भांडवलदारांचा प्रागतिक वाद यांमध्यें तो अधून मधून घुटमळला इतकेंच !''

—( लेनिन : कार्लमार्क्सच्या तत्त्वप्रणालीचें ऐतिहासिक भवितव्य. )

जून—क्रांतीच्या वेळीं मध्यमवर्गीय समाजवाद्यांनीं अनिश्चित आणि धरसोडीचें धोरण ठेवलें; त्यामुळें कामगार—वर्ग चिरडला गेल्यावर या समाजवाद्यांचा सपशेल फज्जा उडाला आणि लोकसत्तावादी भांडवलदारांनींहि माघार घेतली आणि अखेर तिसऱ्या नेपोलियनच्या हातीं सत्ता गेली; प्रतिक्रांति विजयी झाली.

## १८४८ सालच्या क्रांत्यांनीं काय शिकविलें ?

जर्मनींत तर भांडवली लोकशाही क्रांतीहि पूर्ण झाली नाहीं. जर्मन भांडवलदारवर्ग इतर वर्गांच्या मानानें कमताकद होता. त्यामुळें क्रांतीचा सुरुवातीचा झपाटा पाहूनच पुढील संभाव्य परिणामाची 'हाय' घेऊन भांडवलदारवर्गानें सरंजामदारवर्ग आणि राजेशाही यांशीं तडजोड केली आणि भांडवली लोकशाहीसाठीं झगडण्याचेंहि नाकारलें.

१८४८च्या घटनांतून दोन गोष्टी स्पष्ट झाल्या; पहिली गोष्ट अशी कीं, फक्त कामगारवर्गच समाजवादी क्रांतीचा खरा पुरस्कर्ता असल्यामुळें ही क्रांति या वर्गाच्या पुढारीपणाखालींच होऊं शकते. दुसरी ही कीं, कामगारवर्ग समाजवादी क्रांति करील या भीतीनें भांडवलदारवर्ग भांडवली क्रांति पुरी करण्यासहि सरंजामदारीचा पुरा नाश करावयास तर तयार होत नाहींच, उलट कामगारांविरुद्ध त्या वर्गाशीं एकजूट करतो ! अशा परिस्थितींत भांडवली तऱ्हेची लोकशाही आणण्याचें ऐतिहासिक कार्यहि कामगार-वर्गालाच पुरें करावें लागलें ही गोष्ट स्पष्ट झाली. जर्मनींत केवळ १८४८ सालींच नव्हे तर त्यानंतर अनेकदां आणि विशेषतः पहिल्या महायुद्धानंतर भांडवलदार वर्गानें सरंजामदार वर्ग आणि लष्करी अधिकारीवर्ग यांचेशीं एकजूट केली आणि मध्यमवर्गीय समाजवाद्यांनीं शरणागतीचा मार्ग पत्करला.

भांडवलदारवर्गाची ही भूमिका गेल्या शंभर वर्षांत जगांत सर्वत्र अधिकाधिक स्पष्टपणें अनुभवास आली आहे. आज लोकक्रांतीच्या यशाला भिऊन

अमेरिकन आणि ब्रिटिश साम्राज्यवादी भांडवलदार जागोजागच्या प्रतिगामी सरंजामदारी वर्गाला उचलून धरीत आहेत (उदा० चीन, ग्रीस, तुर्कस्तान, मध्यपूर्वेतील अरब देश, स्पेन). सोशल डेमोक्रॅट्स् समाजवादी आज शंभर वर्षांनंतरहि तेंच भांडवल-धार्जिणें राजकारण युरोपांत खेळत आहेत हें बेव्हिन, ब्लम, शूमाकेर, सॅरागाट या समाजवाद्यांच्या कृतींमधून स्पष्टपणें प्रत्ययास येत आहे. इतकेंच काय पण चीन-हिंदुस्थानसारख्या वासाहतिक देशांतील तद्देशीय भांडवलदार-वर्गहि राष्ट्रीय स्वातंत्र्य आणि भांडवली लोकशाही पूर्णपणें प्रस्थापित करण्यास तयार नसल्याचें दिसून येत आहे. तसें करण्यापेक्षां संस्थानी सरंजामदार, जमीनदार आणि परकीय साम्राज्यवादी यांशीं तडजोड साधणें बरें, अशी भूमिका तो घेतो. धनिकांच्या हुकुमशाहीकडे नेणारी ही धूर्तांची एकजूट पाहून सुद्धां समाजवादी मध्यमवर्गीय लोकशाहीच्या नांवाखालीं लोक क्रांतीच्या पायांत अडसर घालतांना दिसत आहेत.

१८४८ सालच्या क्रांत्या अयशस्वी झाल्या व कामगार वर्गाला राजदंड हस्तगत करतां आला नाहीं हें जरी खरें असलें तरी त्यामुळें कामगार-चळवळीचा दृष्टिकोन अधिक शास्त्रशुद्ध होण्यास मदत झाली यांत शंका नाहीं.

" कांहीं थोडीं अपवादवजा पृष्ठें सोडलीं तर १८४८-४९ सालच्या क्रांतीच्या बखरीच्या प्रत्येक महत्त्वाच्या प्रकरणाला क्रांतीचें अपयश हेंच शीर्षक देणें योग्य होईल.

या अपयशांच्या लोंढ्यांत अनेक गोष्टी नष्ट झाल्या; पण क्रांति तर खासच नष्ट झाली नाहीं. क्रांतीपूर्वीच्या काळांत ज्या वेळीं वर्गविरोध तीव्र झाले नव्हते, त्या वेळच्या सामाजिक संबंधांतून उद्भवलेल्या अनेक परंपरागत गोष्टी—व्यक्ती, विचार, मनोराज्यें, खोट्या अपेक्षा—फेब्रुवारीक्रांतीपूर्वीच्या क्रांतिकारक पक्षाला चिकटून राहिल्या होत्या, त्या सर्व नाहींशा होऊं लागल्या. फेब्रुवारी-क्रांति यशस्वी झाली असती तर क्रांतिकारक पक्ष यांपासून मुक्त झाला नसता, त्यासाठीं अपयशांमागून अपयश येणेंच आवश्यक होतें. "

—[ मार्क्स : फ्रान्समधील वर्गलढे. ]

मार्क्सवादानें या अपयशांची छाननी आणि कारणमीमांसाहि केली. तात्कालिक चुकांमुळें क्रांति अपेशी ठरली नव्हती; अपयशांचें कारण त्या वेळच्या एकंदर परिस्थितींतच अंतर्भूत होतें. भांडवली अर्थव्यवस्था त्या वेळीं विकासशील होती आणि तिला आपले पंख पसरण्यास जगभर वाव होता.

खुद्द युरोपांतहि भांडवली प्रगति पूर्ण झाली नव्हती. कॅलिफोर्निया, ऑस्ट्रेलिया इत्यादि प्रदेशांत वसाहती होऊं लागल्या होत्या. चीन-जपानची बाजारपेठ नुकतीच खुली होत होती. भांडवली अर्थव्यवस्था परिपक्व झालेली नसल्यामुळें समाजवादी क्रांतीचा प्रयत्न यशस्वी होणें अशक्य होतें. स्वतंत्र ध्येय, कार्यक्रम आणि पक्षसंघटना निर्माण करून निर्णायक लढा देण्याइतकी राजकीय जागृति आणि ताकद कामगार-वर्गाच्या अंगीं अद्याप आली नव्हती. उलट कामगारवर्गाच्या जागृतीचीं पूर्वचिन्हें पाहून भांडवलदारवर्गानें भांडवली क्रांतीपासून काढता पाय घेतला आणि प्रतिगामी सरंजामदारी वर्गाशीं संगनमत केलें. यामुळें भांडवली तऱ्हेच्या लोकशाही क्रांतीलाहि पायबंद बसत होता.

या सर्व घडामोडींचें मार्क्सनें नीट अवलोकन केलें. पाश्चात्य भांडवली राष्ट्रांतील कामगार-चळवळीची मंद प्रगति आणि पाश्चात्य राष्ट्रांचा हिंदुस्तान, चीन, वगैरे देशांत होणारा साम्राज्यप्रसार यांचा परस्पर-संबंध त्यानें उलगडून दाखविला. साम्राज्यांतून आणलेल्या लुटींतील उच्छिष्टें कांहीं थोड्या कामगारांच्या तोंडावर टाकून ब्रिटिश भांडवलदार कामगार-चळवळ खच्ची करीत होते. यामुळें ब्रिटिश कामगारवर्ग क्रांतीचा मार्ग सोडून सुधारणावादाची-सनदशीर चळवळीची वाट धरूं लागले. इतर देशांत लोकशाहीसाठीं होणारे क्रांतिकारक उठाव चिरडून टाकण्यासाठीं ब्रिटन पैसा ओतीत होतें. "क्रांतीच्या लाटा इंग्लंडच्या खडकावर आदळतात, कोसळतात आणि नष्ट होतात" असें मार्मिक वर्णन मार्क्सनें केलें आहे. महायुद्ध होऊन ब्रिटिश भांडवलदारांची शक्ति नष्ट झाल्याखेरीज इंग्लंडमधील कामगार-चळवळीला धार चढणार नाहीं असें दूरगामी निदान त्यानें केलें होतें.








# मार्क्सवादाचें एक शतक

हिंदुस्थान आणि चीन यांविषयीं १८५२ सालानंतर मार्क्सनें लिहिलेलीं बातमीपत्रें आणि मार्क्स–एंगल्स–पत्रव्यवहार यांवरून मार्क्सची दूरवर पोंचणारी दृष्टि प्रतीत होते. भांडवली साम्राज्यशाहीच्या निष्ठुर आघातानें या पौर्वात्य देशांतील जुनाट समाजव्यवस्था कशी कोसळून पडत आहे, पण त्यांतूनच नव्या क्रांतिकारक शक्ती साम्राज्यवाद्यांच्या इच्छेस न जुमानतां कशा अपरिहार्यपणें उत्पन्न होणार आहेत आणि या परतंत्र राष्ट्रांचे साम्राज्यविरोधी स्वातंत्र्यलढे आणि साम्राज्यवादी राष्ट्रांतील कामगार–क्रांतीचे अंतर्गत लढे एकमेकांस कसे पोषक आहेत यांचें विवेचन मार्क्सनें केलें होतें. मार्क्सवाद ही पाश्चात्य चीज आहे, हिंदुस्थानसारख्या पौर्वात्य देशांशीं त्याचा संबंध नाहीं, अशा प्रकारचीं चुकीचीं विधानें अनेकदां केलेलीं दिसतात. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं शंभर वर्षांपूर्वीं—हिंदी स्वातंत्र्य–चळवळ अस्तित्वांतहि नसल्या वेळीं—मार्क्सवादाच्या खुद्द प्रणेत्यानेंच या घटनांचें निरीक्षण आणि विवेचन केलें होतें.

## पहिली इंटरनॅशनल (१८६४–७२)

युरोपांतील क्रांत्या अयशस्वी झाल्या. कामगारवर्गावर भीषण दडपशाही झाली, इंग्लंडमधील कामगारांची चार्टिस्ट चळवळ अखेरची झेंप घेऊन सरकारी दडपशाहीखालीं विराम पावली. याप्रमाणें कामगार–चळवळीची पहिली लाट ओसरली. पण ही पिछेहाट तात्कालिक होती. भांडवलदारीचा प्रसार होत असल्यामुळें सर्वत्र कामगार–वर्ग वाढत होता, संघटित होत होता. १८६४ सालीं लंडन शहरीं पहिली आंतरराष्ट्रीय कामगार-संघटना—**पहिली इंटरनॅशनल** स्थापन झाली. ब्रिटनमधील व अमेरिकेंतील फारसे कामगार हींत ओढले गेले नव्हते. तरी युरोपांतील कामगार–चळवळी एकत्र आणण्यांत तिला बरेंच यश आलें. अठ्ठेचाळीस सालच्या क्रांतिकालांत कम्युनिस्ट–जाहीरनाम्यांतील विचारांची प्रत्यक्ष प्रतीति आली असल्यानें कामगार–चळवळीवर मार्क्सवादाचा वाढता प्रभाव पडणें स्वाभाविक होतें. पहिली इंटरनॅशनल स्थापण्यांत खुद्द मार्क्सनेंच पुढाकार घेतला होता. फ्रान्समधील प्रुधाँ आणि जर्मनींतील लासाल यांचा सुधारणावाद आणि बाकुनिनचा अराज्यवाद यांचेशीं मार्क्सवादानें दोन हात करून इंटरनॅशनलमध्यें आपलें वर्चस्व प्रस्थापित केलें. पुढें 'पॅरिस–कम्यून'नंतर झालेल्या दडपशाहीमुळें आणि कित्येक समाजवादी पुढारी भांडवलधार्जिणे बनल्यामुळें पहिल्या इंटरनॅशनलला उतरती कळा लागून ती १८७४मध्यें बरखास्त झाली. तरी पण पहिल्या इंटरनॅशनलनें आंतरराष्ट्रीय कामगारचळवळीचा पाया घातला असें म्हणावयास हरकत नाहीं. यानंतर आठदहा वर्षांच्या आंतच युरोपांतील कामगार–संघटना आणि समाजवादी चळवळ मार्क्सवादाचें नेतृत्व मान्य करूं लागल्या.

याचबरोबर मार्क्स आणि एंगल्स हे भांडवली अर्थशास्त्र, समाजव्यवस्था, इतिहास, शास्त्र या सर्वांची छाननी करून त्यांविषयीं मार्क्सवादी दृष्टिकोन स्पष्ट करीत होते व समाजवादाच्या नांवाखालीं वावरणाऱ्या सुधारणावादी, मनोराज्यवादी प्रवृत्तींचा समाचार घेत होते. 'कॅपिटल' या सुप्रसिद्ध ग्रंथाचा पहिला भाग प्रसिद्ध झाला. त्याचप्रमाणें निरनिराळ्या घटनांच्या अनुरोधानें कामगार–चळवळीला मार्गदर्शन करणारे, धोरण स्पष्ट करणारे आणि डावपेंच सांगणारे टीका–लेख त्यांनीं लिहिले. याप्रमाणें मार्क्सवादाचा विकास आणि वाढ होत राहिली.

## पॅरिस--कम्यून १८७१.

पॅरिस–कम्यूननें मार्क्सवादी चळवळीच्या या कालखंडाचा कळस गांठला. १८७०मध्यें जर्मनी व फ्रान्स यांमध्यें युद्ध जुंपून जर्मन सैन्यानें पॅरिसला वेढा दिला. फ्रेंच भांडवलदार आणि सरकार यांनीं पॅरिस सोडून द्यावयाचें ठरविलें. पण पॅरिसच्या शूर कामगारांनीं शरणागतीचा मार्ग धिक्कारला व पॅरिसच्या रक्षणासाठीं उठाव करून त्यांनीं तेथें कामगारांची सत्ता स्थापन केली. यामुळें फ्रेंच भांडवलदार आणि सरकार यांना धडकी भरली व त्यांनीं जर्मनीशीं तहाचीं बोलणीं सुरू केलीं आणि अखेर सहा आठवड्यांच्या उज्ज्वल कारकीर्दीनंतर पहिलें कामगार–राज्य स्वदेशांतील भांडवलदारांशीं लढतां लढतां रक्ताच्या डोहांत बुडालें ! कम्यूनच्या समाप्तीनंतरहि फ्रेंच सरकारनें हजारों कामगारांना गोळ्या घालून सत्ताधारी वरिष्ठ वर्गाच्या अमानुष क्रौर्याचें हिडीस प्रदर्शन केलें !








पॅरिस–कम्यूनचें महत्त्व दोन प्रकारचें आहे. भांडवलदार–वर्गाची राष्ट्रीय स्वातंत्र्याची आणि राष्ट्राभिमानाची घोषणा किती दिखाऊ आहे व कामगारांच्या हातीं सत्ता जातें असें दिसतांच राष्ट्राचें स्वातंत्र्य शत्रूला विकण्यासहि तो मागेंपुढें कसा पाहत नाहीं याची प्रतीति कम्यूननें आणून दिली. हाच अनुभव त्यानंतर अनेकदां आला आहे व येत आहे. ग्रीस, तुर्कस्थान व चीन येथील सत्ताधारी वर्ग लोकक्रांतीला दडपण्यासाठीं अमेरिकन भांडवलदारांचा गुलाम बनला आहे आणि ब्रिटन, फ्रान्स, इटली यांसारख्या देशांतील सत्ताधारी वर्गानें आपलें आर्थिक स्वातंत्र्य अमेरिकेच्या पायाशीं गहाण टाकलें आहे; आणि या सर्व गोष्टी समाजवादाच्या आणि लोकशाहीच्या नांवाखालीं होत आहेत ! राष्ट्रीय स्वातंत्र्याची कल्पना जुनाट झाली आहे, ती टाकून दिली पाहिजे, असे विचार पाश्चात्य साम्राज्यवादी देशांच्या सत्ताधारी वर्गाकडून ( विशेषतः अमेरिकेंत ) मांडले जात आहेत, याचें कारण वरील घटनांत सांठविलेलें आहे. लोकक्रांतीला थोपवून धरण्याच्या खटाटोपांत असलेल्या साम्राज्यवाद्यांच्या मार्गांत राष्ट्रीय स्वातंत्र्याची कल्पना आडवी येते म्हणून तिला टाकाऊ ठरवून अडगळींत फेंकून देण्यास आज ते तयार झाले आहेत.

पॅरिस–कम्यूनचें आणखी एका दृष्टीनें महत्त्व आहे. कम्यूनच्या स्वरूपांत कामगारवर्गाच्या सत्तेचा (डिक्टेटरशिप ऑफ दि प्रोलेटॅरिअटचा) प्रत्यक्ष आविष्कार प्रथम दिसला.

" अलीकडे निर्बुद्ध सोशल डेमोक्रॅटिक सद्गृहस्थांना ' कामगारवर्गीय सत्ता ' ( डिक्टेटरशिप ऑफ दि प्रोलेटॅरिअट ) या शब्दांची पुनः भीति वाटूं लागली आहे. सद्गृहस्थहो, ठीक आहे. ' कामगारवर्गीय सत्ता ' तुम्हांस पाहावयाची आहे ना ? मग पॅरिस–कम्यून पाहून घ्या; ती ' कामगार–वर्गीय सत्ता ' आहे. "—या शब्दांत मार्क्सनें पॅरिस–कम्यूनचें वर्णन केलें आहे. कम्यूनच्या अनुभवांतून मार्क्सनें एक महत्त्वपूर्ण निष्कर्ष काढला. कामगार–वर्गानें आपली सत्ता प्रस्थापित केल्यानंतर जुनें राज्ययंत्र त्याला उपयोगीं पडत नाहीं, तें मोडूनच टाकलें पाहिजे, असा इशारा मार्क्सनें भविष्यकालीन कामगार–चळवळीला दिला.

पॅरिस–कम्यूनपावेतों मार्क्सवादी चळवळीचा पहिला कालखंड समाप्त होतो. या कालखंडाचा आढावा लेनिननें पुढील शब्दांत घेतला आहे:—

" पहिल्या कालखंडाच्या सुरुवातीस मार्क्सच्या शिकवणीचा प्रभाव फारसा पडलेला नव्हता. समाजवादाच्या अनेक विचारप्रवाहांपैकीं तो एक प्रवाह होता.

१८४८ सालच्या क्रांतीनें मार्क्सपूर्वींच्या या वृथा कल्पना करणाऱ्या वेगवेगळ्या समाजवादी प्रकारांना जोराचा धक्का दिला. वर्गनिरपेक्ष समाजवादाचीं आणि वर्गनिरपेक्ष राजकारणाचीं तत्त्वें अगदीं निरर्थक आहेत असें दिसून आलें.

"पॅरिस–कम्यूननें हें कार्य तडीस नेलें ( १८७१ ). क्रांतिकारक आंदोलनांनीं भरलेल्या या पहिल्या कालखंडाच्या (१८४८ ते १८७१) शेवटीं मार्क्सपूर्वींचा समाजवाद नष्ट झाला व खास कामगारवर्गीय अशा दोन संघटना निर्माण झाल्या : पहिली इंटरनॅशनल (१८६४ ते १८७२ ) आणि जर्मनींतील सोशल डेमोक्रॅटिक पक्ष."

—[ लेनिन : कार्ल मार्क्सच्या तत्त्वप्रणालीचें ऐतिहासिक भवितव्य. ]

---










# विनोद-वृत्ति

श्री. त्र्यं. सी. कारखानीस.

विनोदवृत्तीला चेष्टेखोरपणा मानून गंभीर वृत्तीचीं माणसें तिचा कितीहि तिरस्कार करोत, पण ती वृत्ति अशी उपेक्षणीय आहे असें म्हणतां येणार नाहीं.

या जगांत अल्पशक्ति मानवाला प्रचंड शक्तीच्या निसर्गाशीं सामना द्यावा लागतो. व्यक्तीला समाजाशीं झुंझावें लागतें. शिवाय तिला आपल्या आधिव्याधींशींहि झगडावें लागतें. या सर्व प्रकारच्या संग्रामांत कमीअधिक विकट प्रसंग येतात. त्यांचा परिहार करण्याचे अचूक उपाय मनुष्याला नेहमींच करतां येतात असें नाहीं. ज्ञानी पुरुष अशा प्रसंगीं परमार्थानें आणि भाविक भक्त देवावर भार टाकून समाधान प्राप्त करून घेतात; पण सामान्य संसारी ाणसाला विनोदवृत्तीशिवाय गत्यंतर नसतें. मनु- ाच्या नाइलाजपणावर हाच एक इलाज आहे. श. ान्य संसारी माणसें थोडींशीं सुज्ञ असलीं म्हणजे पाह च अवलंब करतात असें आढळून येतें. प्रत्यक्ष हंसून ीतील कांहीं उदाहरणें मी देतों; त्यांवरून हें इतकी येईल. हीं उदाहरणें माझ्या रंगभूमीच्या अवस्थेंत ीतील दोन प्रसिद्ध व्यक्तींच्या चरित्रांतील न्यावें हें वर आलें

## मनाआड आयर्व्हिंग याचा एक अनुभव

जन्मापासू साव्या शतकाच्या अखेरीस इंग्लंडच्या रंगभूमीवर गाजलेला सुप्रसिद्ध नट सर हेन्री आयर्व्हिंग याच्या एका चरित्रांत त्यानें स्वतःच सांगितलेली एक गोष्ट दिली आहे. लहानपणीं सुमारें चार वर्षांचा असतांना तो आपली मावशी मिसेस् पेनवर्थी हिच्या घरीं राहत होता. मावशीला जवळजवळ त्याच्याच वयाचे दोन मुलगे व एक मुलगी अशीं तीन मुलें होतीं. त्यांच्याशीं खेळण्या-बागडण्यांत त्याचें बालपण गेलें. मावशीचा नवरा मि. पेनवर्थी हा कॉर्नवॉलमधील खाणींचा कॅप्टन होता. तो शरीरानें उंच व धिप्पाड असून मनानें प्रेमळ व उमदा होता. मिसेस् पेनवर्थींचें वर्णन स्वतः आयर्व्हिंगनें एकाच वाक्यांत मोठ्या मार्मिकपणानें केलें आहे. 'If there was a born queen, it was my aunt (जन्मजात राज्ञी अशी जर कुणी असेल तर ती माझी मावशीच होय).' उभयतांहि परस्परांना अनुरूप, त्यामुळें त्यांचा संसार सर्वांनाच मोठा सुखदायक होता. त्यांच्यांत कधीं भांडण झाल्याचें आयर्व्हिंगला स्मरत नाहीं. तीं नेहमीं आनंदी दिसत. "पण एके दिवशीं काय झालें कुणास ठाऊक, घरीं किंवा खाणीमध्यें कुणीं कांहीं राग येण्यासारखें केलें कीं काय न कळे. पण कॅ. पेनवर्थी त्या दिवशीं मध्येंच अचानक घरीं आले. मावशी बाहेर गेलेली होती; ते आले ते तडक स्वयंपाकघरांत आले. आम्ही मुलें तेथेंच खेळत होतों. काकांना अचानक आलेले पाहून आम्ही चकित झालों. आणि त्यांचें पुढील वर्तन पाहून तर भेदरूनच गेलों त्यांनीं येतांक्षणींच तेथील खुर्च्या वगैरे सामानाची एकदम मोडतोड करावयासच सुरुवात केली. खुर्च्या कांहीं तकलादी नव्हत्या, चांगल्या भल्याभक्कम जाडजूड होत्या; पण त्या धिप्पाड पुरुषानें आपल्या गुडघ्यावर त्या काटक्यांप्रमाणें भराभर



अनुक्रमणिका






मोडून टाकल्या! कपाटें, त्यांतील खण, सर्वांचा अगदीं चक्काचूर केला आणि तडक ते पुनः खाणीकडे निघून गेले. ते गेल्यावर मग आम्हांला जरा हायसें वाटलें. आतां घरची 'राणी' येईल आणि सर्व कांहीं पाहून घेईल या कल्पनेनें आमची भीति नाहींशी झाली. मावशी आली, तिनें सर्व प्रकार पाहिला, शांतपणानें तो सारा पसारा आंवरला आणि एकाद्या प्रदर्शनाप्रमाणें त्याची मांडणी करून ठेवली. संध्याकाळीं नेहमींप्रमाणें मावशीबरोबर आम्ही सर्व मुलें काकांना घेऊन येण्यासाठीं गेलों. त्यांची धिप्पाड मूर्ति दुरून येत असलेली आम्हांला दिसली. झालेल्या प्रकाराचा लवलेशहि त्यांच्या चेहऱ्यावर दिसला नाहीं. नेहमींचीच उल्हासवृत्ति! त्याच वृत्तीनें ते आम्हांला भेटले, आमच्याशीं वागडले. मावशीचा हात त्यांच्या खांद्यावर, त्यांचा हात तिच्या कमरेभोंवतीं, अशीं तीं उभयतां नेहमींप्रमाणेंच गप्पा-गोष्टी करीत घरीं आलीं. स्वयंपाकघराचा दरवाजा उघडाच होता. साहजिकच आंतील तो प्रदर्शनाचा देखावा काकांच्या दृष्टीस पडला. आतां काय होतें कुणास ठाऊक, अशा भीतीनें आम्ही थबकलों तों काय? मेघगर्जनेप्रमाणें हास्याचा गडगडाट आमच्या कानीं आला! तो धिप्पाड पुरुष आम्हां लहान मुलांप्रमाणें आपलें पोट धरून खो खो हंसतो आहे असेंच आमच्या दृष्टीस पडलें! दुसरा एकादा 'मला हिणवण्यासाठीं हें प्रदर्शन मांडलेंस, होय?' असे रागानें फूत्कार काढीतच तेथून निघून गेला असता; पण मावशीचें चातुर्य व काकांची विनोद-वृत्ति यांच्या हृदयंगम मिलाफानें निर्माण झालेला तो हास्यरसाचा अलोट प्रवाह पाहून आम्ही अगदीं गारेगार होऊन गेलों!''

## शॉला विनोदाचा वारसा वडिलांकडून

दुसरें उदाहरण सुप्रसिद्ध नाटककार, जॉर्ज बर्नार्ड शॉ याच्या चरित्रांतील आहे. माणसांना आपल्या अंगच्या ठळक गुणांचा वारसा थेट आपल्या माता-पित्यांकडून मिळाल्याचें क्वचितच आढळून येतें. पण शॉ मात्र याला अपवाद आहे. "आपणाला 'केवळ आपल्या कल्पनासृष्टींतच रमावें, तेंच आपलें सुखाचें स्थान,' असें वाटतें" असे उद्गार त्यानें Immaturity (अपरिपक्वता) या कादंबरीच्या प्रस्तावनेंत काढले आहेत. ही त्याची वृत्ति त्याला त्याच्या आईकडून प्राप्त झालेली आहे. तिच्या संसारी जीवनांत तिला अगदीं कटु अनुभव आलेला होता. जात्याच ती एकलकोंडी, त्यांत हा कटु अनुभव! त्यामुळें साहजिकच ती अंतर्मुख, आत्मनिष्ठ व स्वावलंबी बनली व आपल्या कल्पनासृष्टींतच समाधान मानून घेऊं लागली. शिवाय, संसारांतील कटु अनुभवामुळें वास्तवसृष्टींतील जबाबदाऱ्या तिला पार पाडतां येणें अशक्य झालें म्हणून व तिचा आवाज चांगला असल्याकारणानें, तिनें संगीताचा आश्रय केला व त्यांत प्रावीण्य संपादन करून त्यांतच सारें जीवित व्यतीत केलें. ही आईच्या अंगची अंतर्मुख वृत्ति, तद्वतच स्वावलंबीपणा व संगीतकलेंतील ज्ञान हीं शॉच्या अंगीं आईकडून वारसारूपानें आलेलीं आहेत. मात्र विनोद हा जो शॉच्या अंगचा दुसरा ठळक गुण त्याचा लवलेशहि त्याच्या आईच्या अंगीं नव्हता. त्याचा वारसा त्याला आपल्या बापाकडून मिळालेला आहे.

शॉचा केवळ बापच नव्हे, तर आई सोडून बाकी सारें शॉकुटुंबच विनोदी वृत्तीचें बनलेलें होतें. नाइलाजपणामुळें माणसाला विनोद-वृत्तीचा अवलंब कसा करावा लागतो याचें शॉकुटुंब हें एक नमुनेदार उदाहरण आहे. मात्र ही नाइलाजपणाची आपत्ति शॉच्या बापामुळेंच त्या कुटुंबावर आलेली होती. एकंदर शॉघराणें डब्लिनमध्यें प्रतिष्ठित म्हणून गणलें गेलेलें होतें. त्यांपैकीं अनेकांनीं निरनिराळ्या व्यव[illegible] सायांत नांवलौकिक मिळविलेला होता. आपलें घरा[illegible] इतरांहून वेगळें—अगदीं उच्च दर्जाचें आहे असें घराण्यांतील प्रत्येकाला वाटत असे. पण त्यांत [illegible] बाप जॉर्ज कार हा दारूबाज निघाला. शॉच्या [illegible] ला संसारांत कटु अनुभव आल्याचें वर [illegible] आहे, त्याला कारण हा त्याच्या बापाचा [illegible] पणाच होय. त्यामुळें एकंदर शॉघराण्या[illegible] समाजांत कमी होऊं लागली. म्हणून त्या [illegible] शॉकुटुंबावर बहिष्कार घातला. कोणीहि [illegible] आपल्याकडे जेवावयास बोलावीनासें झालें. याची प्रतिक्रिया त्या कुटुंबावर अशी झाली कीं, त्या कुटुंबांतील आईखेरीज सर्वच बेफिकीर बनले आणि आत्मरक्षणासाठीं त्यांनीं विनोद-वृत्तीचा अवलंब







केला. तसा तो त्यांनीं केला नसता तर बहिष्कृत म्हणून लज्जेनें खालीं मान घालून मनांतल्या मनांत कुढतच त्यांना जीवन कंठावें लागलें असतें. मोठ्या शहरांतील विश्वकुटुंबी (Cosmopolitan) आधुनिक जनतेला ही बहिष्कृत अवस्था कशी असते याची कल्पना येणें शक्य नाहीं. समकालीन डॉ. आंबेड-करांसारख्या विद्वान् हरिजनाची क्षोभकारक कहाणी जर कोणाच्या कानीं आली असेल, तर कदाचित् त्या अवस्थेची थोडीशी कल्पना त्याला करतां येईल.

या शॉकुटुंबीयांच्या विनोद-वृत्तीचें प्रदर्शन एकादा कारुण्य उत्पन्न करणारा प्रसंग असतांहि कसें होत असे, याचें एक नमुनेदार उदाहरण शॉच्या चरित्रांत दिलेलें आहे. एकदां शॉचा बाप खूप दारू पिऊन तर्र झालेला असा घरा-कडे येत होता. तो कितीहि दारू प्याला तरी गटारांत पडण्याइतका कैफ त्याला येत नसे. आपल्या पायीं तो घराकडे यावयाचा. एका काखेंत अर्धवट गुंडाळलेलें मृत बदक आणि दुसऱ्या काखेंत डुकराचा फरा अशा थाटांत स्वारी झोकांड्या खांत घरा-पाशीं आली. डोळ्यांवर कैफाची झांपड! स्वारी आली ती बागेच्या आवाराच्या भिंतीवरच डोक्यानें धडका द्यायला लागली. फाटक तेथेंच आहे अशी समजूत! डोक्यावरील टोपीचा चोळा-मोळा होऊन ती खालीं पडली तरीहि स्वारी धडका मारी-तच होती! कुटुंबांतील सारी मंडळी—अर्थात् शॉच्या आईखेरीज—जमा होऊन तो सारा प्रकार पाहत होती. लहानगा शॉहि त्यांत होताच. साऱ्यांच्या हंसून हंसून मुरकुंड्या वळत होत्या. शॉची तर इतकी दामटी वळली कीं, आपल्या बापाची त्या अवस्थेंत टका करून त्याला हातीं धरून घरांत न्यावें हें हीं त्याला जमलें नाहीं. अगदीं उघड्या-वर आलें गृहच्छिद्र सर्वांनीं हास्याच्या पड्यानेंच मनाआड केलें. असल्या प्रकारचें हें बाळकडू शॉला जन्मापासून पिळालेलें आहे.

## गांभीर्याच्या अतिरेकावर विनोदाचा उतारा

शॉच्या कुटुंबांतील मंडळीच्या ठायीं, त्याच्या बापाच्या दारूबाजपणामुळें नाइलाज म्हणून निर्माण झालेल्या विनोदवृत्तीचें हें उदाहरण दिलें. पण शॉचा बाप हा तर जात्याच विनोद-वृत्तीचा होता आणि त्याची ही वृत्ति एका विशिष्ट तऱ्हेची होती. गांभीर्याचा किंवा कारुण्याचा एकादा प्रसंग अति-रेकाला गेला कीं एकदम हास्याची पलटी देऊन त्याचा अगदीं निरास करून टाकावयाचा अशी त्याच्या विनोद-वृत्तीची तऱ्हा होती. तिचीं कांहीं उदाहरणें फार गंमतीचीं आहेत.

शॉच्या बापाला साठ पौंडांचें वार्षिक वेतन मिळत असे. तेवढेंच त्याचें उत्पन्न. उद्योग कांहीं नाहीं. मग येवढ्यावर निर्वाह कसा व्हावा? म्हणून त्यानें एक शक्कल काढली. त्या वेतनाचा हक्क विकून भांडवल उभें केलें आणि घाऊक विक्रीचें एक दुकान खरेदी करून धंदा आरंभला. दुकानदारीचें काडीचेंहि ज्ञान नाहीं! जोडीला एक भागीदार घेतला तोहि तसाच! उभय-तांचीहि समजूत कीं रानांत झाडांना जशीं आपो-आप फुलें-फळें येतात तसाच दुकानालाहि नफा हा यायचाच! फक्त शेठ म्हणून आपण गादीवर बसलों म्हणजे झालें! असल्या व्यवहारशून्यतेचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. दुकानाच्या एका मोठ्या उधारीच्या गिऱ्हाइकाचें दिवाळें निघालें, त्यामुळें यांचें दुकानहि गडगडलें! भागीदार बिचारा अगदीं हताश होऊन गेला; तोच काय, कोणीहि असल्या आघातानें रडकुंडीला आला असता! पण शॉचा बाप कसला खमंग! तो खुशाल एकीकडे जाऊन पोट धरधरून हंसला आणि त्या प्रसंगाला झटकून टाकून त्यांतून मोकळा झाला.

ही त्याची विनोद-वृत्ति इतकी अनावर होती कीं तो प्रॉटेस्टंट् असूनहि बायबलसंबंधीं चर्चा चालू असली तर त्या प्रसंगींहि ती तो आंवरूं शकत नसे. घरांतील एकंदर बेफिकिरीच्या वातावरणामुळें शॉ अगदीं स्वतंत्र विचाराचा बनलेला होता. "I became a Free-thinker before I knew how to think (विचार करण्याचें सामर्थ्य अंगीं येण्यापूर्वींच मी स्वतंत्र विचाराचा बनून गेलों होतों)" असें तो एके ठिकाणीं म्हणतो. याचा परिणाम असा झाला कीं, तो बायबलबद्दलहि अना-दराचे उद्गार काढूं लागला. अशाच एका प्रसंगीं त्याच्या बापानें अंगीं आणवेल तितका गंभीरपणाचा







आव आणून त्याची कानउघाडणी करण्याचा प्रथम प्रयत्न केला. " छट्, काय बोलतोस हें? असें बोलणें शुद्ध अडाणीपणाचें आहे. बायबल हें असें क्षुद्र नाहीं. जगांतील सर्व इतिहासविषयक व साहित्य-विषयक ग्रंथांचा मेरुमणि शोभेल अशा योग्यतेचें आहे तें!" पण पुढें इतकी कानउघाडणी केल्या-वर त्याच्या लक्षांत आलें कीं ही गौरवाची अगदीं परिसीमा झाली. त्याबरोबर आंतून हास्याच्या उक-ळ्यावर उकळ्या येत असाव्या अशा रीतीनें त्याचे डोळे चमकूं लागले. आतां पुढें काय येणार हें शॉ जाणूनच होता. बापानें अशी एकदम पलटी घेतली कीं, एकादा बायबलाचा कट्टा दुष्मनहि उच्चा-रण्यास धजणार नाहीं असे उद्गार त्याच्या तोंडून बाहेर पडले : " ऊः! बाकी खरें सांगायचें तर तें एक खोट्यानाट्या गोष्टींनीं भरलेलें भिकार चोपडें आहे झालें!" इतकें बोलून मग किती वेळ तरी स्वारी मनांतल्या मनांत हंसत राहिली! "आमच्या-मध्यें मग हा एक नेहमीचा खेळच होऊन बसला. मीं बायबलबद्दल त्यांना चिडवावें आणि त्यांनीं आपल्या मनमुराद चेष्टेखोरपणाचें प्रदर्शन करावें" असें शॉनें याबद्दल लिहिलें आहे. अगदीं क्षुल्लक प्रसंगांतूनहि करुणरसाचे पूर निर्माण केल्याचीं उदाहरणें इतर नाटककारांच्या नाटकांतून मनमुराद सांपडतील; पण कारुण्यजनक किंवा गंभीर असा प्रसंग पराकोटीला जातोसा वाटला कीं एक-दम त्याला हास्यरसाची कलाटणी देऊन चीत करून टाकावयाचा जो कटाक्ष शॉच्या नाटकांत दिसून येतो, तो बापाच्या वर सांगितलेल्या प्रकारच्या विशिष्ट विनोद–वृत्तींतूनच परंपरेनें शॉमध्यें उतरलेला असावा.

## शॉची ध्येयप्रेरित प्रचारकी कला

पण शॉमध्यें ही जी विनोद–वृत्ति परंपरेनें आली, तिचा उपयोग स्वतःच्या जीवनांत परंपरा-गत मार्गानेंच त्याला करावा लागला असें नाहीं. कारण 'नाइलाजपणा' हा शब्दच मुळीं त्याच्या कोषांत नाहीं. 'Where there is a will, there is a way (दृढभाव एक, नेइ जीवा निश्चिता, आपुल्या पदा)' असें त्याचें मानवी जीवनाविषयींचें तत्त्वज्ञान आहे. म्हणून नाइलाजपणास्तव विनोद-वृत्तीचा अवलंब करावा लागण्याची पाळीच त्याच्या-वर आली नाहीं. तो आपल्या इतर कुटुंबीयांप्रमाणें सामान्य संसारी माणूस नव्हे. तत्त्वज्ञानी असून शिवाय तो प्रतिभावान् कलावंतहि आहे. पण त्याची कला ही केवळ कलेसाठीं नाहीं. " But 'for art's sake' alone I would not face the toil of writing a single sentence (केवळ कलेसाठीं म्हणून एक वाक्यहि लिहिण्याची तसदी मी घेणार नाहीं)" असा त्याचा बाणा आहे. कला ही जीवन अधिक उन्नत करण्यासाठींच आहे आणि आपल्या कलेचा उपयोग त्यानें जन्मभर त्यासाठींच केलेला आहे; पण त्यामुळें त्याला 'प्रचारकी कलावंत' अशी हीनतादर्शक पदवी इतर कलावंतांकडून व त्यांच्या पाठीराख्यांकडून मिळालेली आहे. तरीहि पण 'त्याला कीर्तिमंदिरांत मानाचें स्थान निः–संशय आहे' असा आपला अभिप्राय त्याचा चरित्रकार हेंडर्सन् यानें एका भाषणांत व्यक्त केला आहे:—"शॉचीं नाटकें—चर्चात्मक नाटकें असें तो त्यांना नांव देतो—हीं मुख्यतः मानवी प्राणी, त्यांचे स्वभाव किंवा त्यांचें भवितव्य यांचें विश्लेषण करणारीं नाहींत, तर सामाजिक, राजकीय व आर्थिक अशा सार्‍या संप्रदायांचीं गलिच्छ स्वरूपें उघडीं–नागडीं करून त्यांचा निःपात करावा या हेतूनें लिहिलेलीं आहेत. व्हॉल्टेयरप्रमाणेंच तो प्रचा-रकी लेखक* आहे. त्याचें केवळ आर्थिक लिखाणच पाहिलें, तर तेवढ्यावरूनहि कीर्तिमंदिरांत त्याला मानाचें स्थान प्राप्त झालें पाहिजे अशा योग्यतेचें तें लिखाण आहे."

वरील विवेचनावरून हें स्पष्ट दिसून येईलच कीं तो साधासुधा निर्मळ कलावंत नाहीं, तर विशिष्ट

---

*हल्लींची जगाची अवस्था संक्रमणाची आहे. बरट्रँड रसेल आपल्या 'Education and the Social Order' या पुस्तकांत म्हणतो : " But in the period of transition propaganda must play a large part." शॉ हा प्रचारी लेखक झाला तो या कारणास्तवच.








ध्येयानें प्रयत्न करणारा प्रचारकी कलावंत आहे; आणि अशा प्रचारकी लिखाणासाठींच त्यानें आपल्या विनोद–वृत्तीचा उपयोग केलेला आहे, केवळ अनुरंजन करण्याकरितां केलेला नाहीं. आप त्या म्हणण्याकडे लोकांचें लक्ष, कसल्या का युक्तीनें होईना, पण बळेंच वेधून घेतलें पाहिजे हा त्याचा कटाक्ष. 'हें जगच असें म्हणजे इतकें सुस्त आहे कीं त्याला खूप चिडविल्यावांचून, मुद्दाम खाजवून त्याची खरूज चेतविल्यावांचून त्याला जाग यावयाची नाहीं,' असे उद्गार त्यानें आपल्या विशिष्ट लिखाणावरील टीकेला उत्तर देतांना काढले आहेत. त्यानें आपल्या विनोद–वृत्तीचा उपयोग करून लिहिलेलें बरेंचसें लिखाण या पद्धतीचेंच आहे. Apple-cart (योजनांचा गाडा) या नाटकांत ॲमँडा या नांवाचें एक स्त्रीपात्र असून त्याला मंत्रिमंडळांत स्थान असतें. राष्ट्रावर आलेल्या आणीबाणीच्या प्रसंगाचा विचार करण्यासाठीं म्हणून भरलेल्या त्या मंडळाच्या सभेंत राजा मॅग्नस हा राज्यत्याग करून आपल्या मुलाला गादी देण्याचा निर्णय जाहीर करतो. यावर पंतप्रधान प्रोटियस यांचें भाषण होतें. त्यांत ते अखेरीस जेव्हां म्हणतात कीं, "कोणीहि का राजा म्हणून गादी चालवीना—?" तेव्हां ॲमँडा मध्येंच उद्गारते, "तुम्हीं आपले पंतप्रधान होणारच!". यावर जो हंशा पिकतो तो अर्थात् आंबट चेहऱ्याचा व चिडविणाराच असतो.

## विनोदवृत्तीमागें शॉचें कोमल हृदय

या बाबतींत त्याच्यावर एक आरोप केला जातो कीं, कोमलता ही त्याचे ठायीं नाहींच, त्याचें हृदय अगदीं कठोर निर्दय आहे आणि अगदीं निर्दयपणानेंच तो आपल्या विनोद–वृत्तीचा उपयोग करतो. हा आरोप किती विकृत व खोटा आहे हें एकदोन उदाहरणें दिलीं असतां सहज कळून येणार आहे. Vivisection(शास्त्रीय संशोधनासाठीं जिवंत प्राण्यांची चीरफाड करण्या)बद्दल त्यानें आयुष्यभर जी मोहीम चालविली ती काय दर्शविते? अनेक प्रकारचीं मानवी व्यंगें हीं डिकन्सपूर्वीच्या काळांतील वाङ्मयांत कशीं निर्दयपणानें थट्टेचे विषय म्हणून समजलीं जात असत, याची यादीच त्यानें एके ठिकाणीं दिली असून त्यांबद्दल आपला तिरस्कार व्यक्त केला आहे.*

कारुण्यजनक प्रसंग असूनहि, तो खो खो हंसण्याचा विषय केल्याबद्दल शॉला वाटणारा तिटकारा, 'जे का रंजले गांजले (मग ते पशुपक्ष्यादि का असेनात), त्यांसी म्हणे जो आपुले' अशा थाटाचा कीगन पॉल नांवाचा एक समदर्शी संत आपल्या 'John Bull's Other Island' या आयर्लंडवरील नाटकांत घालून त्याच्या मुखानें त्यानें व्यक्त केला आहे. चौथ्या अंकांत हा प्रसंग आहे. एक डुक्कर त्याच्या मोटरमध्यें घालून नेलें जात असतां मोटरच्या आवाजानें भेदरून तिच्यांतून निसटण्याचा प्रयत्न करतें. त्यासाठीं त्यानें उडी घेतली, ती ड्रायव्हरच्या मांडीवरच येऊन आदळली! पण तिथें त्याचें शेंपूट एका ट्रॅपमध्यें सांपडतें व तें केंकाटूं लागतें. तो ट्रॅप मोटारीला गति देण्याचा असतो. त्यावर दाब पडल्यानें ती मोटार ड्रॉयव्हरच्या कह्यांत न राहतां आजूबाजूच्या दुकानांत घुसून सामानाची नासाडी करते, असा तो प्रसंग आहे. पुढें या घडलेल्या प्रसंगाचें वर्णन एके ठिकाणीं सांगितलें जात असतां श्रोते खो खो हंसत असतात. कीगन पॉल हा तेथें नोरा या नांवाच्या एका कुमारिकेबरोबर 'बॅकगॅमॉन' (सोंगट्यांसारखा एक खेळ) खेळ खेळत असतां तें वर्णन संथपणानें ऐकत असतो. नोराला तें

* Major Critical Essays, पृ. १२७ व १२८ पाहा. ती यादी अशी:—"फाटक्यातुटक्या चिंध्यांनीं झांकलेलें दारिद्र्य, पीतज्वर, दारू पिऊन झिंगलेला माणूस, लत्ताप्रहार, फटके मारणें, पडणें, भेदरटपणा, सर्व प्रकारचे वेदनामय अपघात, मानभंगांच्या गोष्टी, बाईलवेडा नवरा, कजाग सासू, वृद्धावस्थेंतील दौर्बल्यें, तरुणींचा लाजाळूपणा व जगाच्या व्यवहाराबद्दलचें त्यांचें अज्ञान आणि या सर्वांमुळें होणारीं दुःखें ज्यांना सोसावीं लागतात त्यांना उलट खिजविणें, त्यांचा अपमान करणें, या गोष्टी पराकाष्ठेच्या थट्टेचा विषय म्हणून त्या काळीं समजल्या जात असत."







श्रोत्यांचें हंसणें सोसवत नाहीं. ती त्यांना म्हणते, "तुम्हांला हें ऐकून हंसूं तरी कसें येतें? कीगन पॉल, तुम्हांला हंसूं येतें?"

कीगन पॉल—कां येऊं नये? केवढा धोक्याचा प्रसंग आहे हा? यांत घातपात आहे! यांत छळ आहे! याहून हंसूं येण्यासारखे आणखी कोणते बहारीचे प्रसंग? हं, चालूं द्या, डॉरेन, सांगा पुढें काय झालें तें. आणखी कोणता बहारीचा प्रसंग पुढें घडला, सांगा ना? हंसण्याचा अगदीं कडेलोट होऊन जाऊं द्या. सांगा, पुढें आमुच्या भाऊरायाच्या शरीराचे कसे तुकडे तुकडे झाले तें.

डोरॅन (वर्णन करणारा)–भाऊराया? कुणाचा?

कीगन०—माझा.

नोरा—म्हणजे तें डुक्कर हो. कीगन पॉल प्राणिमात्राला आपले भाईबंदच मानतात, तुम्हांला ठाऊक नाहीं?

डोरॅन—फार वाईट वाटतें सांगायला, तुमच्या त्या भाऊरायानें प्रथम मागल्या बाजूनें ड्रायव्हरकडे उडी घेतली; पण तेवढ्यानें कांहीं त्याचें समाधान झालें नाहीं. पुनः जी त्यानें उडी घेतली ती नेमकी रस्त्यावर मोटारीच्या अगदीं पुढ्यांत! आणि—

कीगन०—आणि मग सारे खो खो हंसतात, होय ना? ... नरक! नरक! जग कसलें? शुद्ध नरक आहे हा! नरकाशिवाय दुसऱ्या कोठेंहि अशा प्रसंगीं हास्याच्या उकळ्यावर उकळ्या फुटणें शक्य नाहीं!"

कीगन पॉल म्हणजे स्वतः शॉच होय. एका टीकाकारानें म्हटलेंच आहे: "Keegan Paul reveals the true Shaw as poet, mystic, artist, humanitarian. (कीगनपॉलमध्यें, कवि, गूढवादी, कलावंत, दयाशील असा शॉच प्रकट झालेला आहे)."

## शॉला मार्क्सपासून मिळालेली दृष्टि

वरील विवेचनावरून शॉनें आपल्या विनोद-वृत्तीचा उपयोग कसा केला आहे हें दिसून येईलच. आरंभीं मीं म्हटलें आहे कीं ज्ञानी पुरुष परमार्थानें बिकट प्रसंगीं समाधान प्राप्त करून घेतात; पण तें समाधान स्वतःपुरतें असतें. इतरांचेंहि त्या मार्गानें ते समाधान करण्याचा प्रयत्न करतात; पण तेंहि व्यक्तिगतच असतें. व्यक्ति ही स्वतंत्र म्हणून राहूं शकत नाहीं; कळप करून म्हणजे समाज बनवूनच तिला राहावें लागतें. त्यामुळें वैयक्तिकच नव्हेत तर सामाजिक बिकट प्रसंगहि उद्भवतात. त्यांचा विचार पूर्वीच्या ज्ञानी पुरुषांनीं केला नाहीं असें नाहीं; पण आधुनिक काळानें सामाजिक व आर्थिक विषमतेचे जे प्रश्न निर्माण केलेले आहेत त्यांचा त्यांना गंधहि नव्हता. त्यामुळें त्यांनीं आपल्या काळीं निर्माण केलेली समाजव्यवस्था पुढें अपुरी पडूं लागली आधुनिक काळांत मार्क्स–एंजल्स-सारख्या ज्ञानी पुरुषांनीं त्या प्रश्नांची चिकित्सा करून छडा लावला आहे व मार्ग काढण्याचा प्रयत्न केला आहे. मार्क्सनें शॉला अगदीं नवी दृष्टि दिली, त्याच्यामध्यें तळमळ उत्पन्न केली व त्याच्या जीवनाचें ध्येय निश्चित केलें. "Marx was a revelation.... He opened my eyes to the facts of history and civilization, gave me an entirely fresh conception of the universe, provided me with a purpose and a mission in life"—असे उद्गार त्यानें एके ठिकाणीं काढले आहेत. शॉचें बहुतेक लिखाण समाजांतील आर्थिक विषमतेसंबधींच कां झालें आहे हें वरील उद्गारांवरून कळून येईल. आर्थिक प्रश्न हे शासनसंस्था व धर्मसंस्था यांचें शुद्धीकरण होऊन त्यांना सुव्यवस्थित स्वरूप आल्याबांचून सुटणारे नाहींत. म्हणून त्या संस्थांचाहि परामर्श त्यानें घेतलेला आहे. शासनसंस्थेच्या अस्तित्वांत आलेल्या सर्व निरनिराळ्या स्वरूपांची चिकित्सा करून त्यानें असा निष्कर्ष काढला आहे कीं त्या कोणत्याहि नांवानें अस्तित्वांत आलेल्या असोत, त्यांच्या पर्यवसानाचें स्वरूप एकच; आणि तें म्हणजे कोणतेहि प्रश्न न सुटतां सर्वत्र गोंधळ माजून नैराश्य! अशा स्थितींत शॉ नेहमीं रशियाचें तुणतुणें कंटाळा येईपर्यंत वाजवीत असतो. 'Too true to be good' या नाटकाच्या प्रस्तावनेंत तो म्हणतो, "I harp on Russia because the Moscow-experiment is the only really new departure from tweedledum and tweedledee (निरनिराळीं नांवें








देऊन एकच गोष्ट पुढें आणणें अशा तऱ्हेचे जगांत जे प्रयत्न चाललेले आहेत, त्यांहून मॉस्को–प्रयोग वेगळ्या प्रकारचा आहे म्हणून मी नेहमीं रशियाचें तुणतुणें वाजवीत असतों )". यावरून शासनसंस्थे-संबंधानें शॉची दृष्टि आशेनें रशियाच्या प्रयोगाकडे पाहत आहे हें दिसून येईल.

## नाट्यमंदिराचें व्यासपीठ

धर्मसंस्थेच्या शुद्धीकरणाविषयीं त्याचें म्हणणें असें कीं ती संस्था शास्त्रीय ज्ञानाच्या प्रवाही झऱ्याच्या सिंचनानें वर्धमान होणारी असली पाहिजे. या दृष्टीनें Creative Evolution (सृजन–शील उत्क्रांति) हाच आतां जगाचा धर्म होऊं पाहत आहे. धर्माचा प्रसार समाजाच्या खालच्या पातळीपर्यंत नेऊन पोंचविण्यासाठीं पुराण-कथा लागतात. अशा सर्व धर्मांच्या कथा अखिल मानवतेसाठीं एकत्र करून त्यांचीं प्रवचनें झालीं पाहिजेत. अशा प्रवचनांसाठीं सर्वोत्कृष्ट व्यासपीठ म्हणजे नाट्यमंदिर होय. धर्माच्या नांवानें समाजांत दंभाचें स्तोम फार माजतें, त्यावर हल्ला चढविण्या-साठीं नेहमीं सुसज्ज असलेला पंचहत्यारी योद्धा शॉ याचें विनोद हें एक प्रभावी हत्यार आहे.आणि त्यानें त्या हत्याराचा उपयोग, आपल्या नाटकांतून म्हणजे नाट्यमंदिराच्या व्यासपीठावरून होणाऱ्या आपल्या प्रवचनांतून सर्रास केलेला आहे. पण शॉच्या या विनोद–वृत्तीबद्दल टॉल्स्टॉयनें एकदां आपली नापसंती व्यक्त केली. Man and Superman (नर व नरोत्तम) हें नाटक वस्तुतः 'Creative Evolution' (म्ह० सृजनशील उत्क्रांति) हा आपला नवा धर्म विशद करून सांगण्यासाठीं शॉनें लिहिलें आहे. म्हणजे या नाटकाचा विषय गंभीर आहे; पण त्यांत शॉ अगदीं ऐन गंभीर प्रसंगीं चेष्टा करून लोकांना हंसावयाला लावतो हें टॉलस्टॉयला आवडलें नाहीं. टॉलस्टॉयच्या या आक्षेपाला शॉनें अगदीं सरळपणानें प्रत्युत्तर केलें, "मीं असें कां करूं नये ? विनोद व हास्य यांवर असा बहिष्कार कां असावा ? हें जग परमेश्वराची एक लीला म्हणूनच जर मानलें जातें, म्हणजे कोणत्याहि गंभीर हेतूनें तें निर्माण झालें आहे असें जर मानलें जात नाहीं, तर मग ती लीला (अर्थात् परमेश्वराची ती चेष्टाच) निदान हीन कोटीला जाऊं न देतां उच्च पातळीवर टिक-विण्याची शक्य ती कोशीस आपण कां करूं नये ?" हें उत्तर ऐकून टॉलस्टॉयला अगदीं कसेंसेंच झालें. परमेश्वराच्या त्या चेष्टेंतील आपणहि एक घटक आहों याची जाणीव त्याच्यासारख्याला होऊं नये याचा कोणालाहि खेदच वाटेल.

## आधुनिक 'Laughing Philosopher'

याचे उलट ग्रीक नाटककार युरिपिडीस व ॲरि-स्टोफेनिस यांच्या नाटकांचीं भाषांतरें करणारा जिल्बर्ट मरे यानें आपलें ॲरिस्टोफॅनिसवरील पुस्तक शॉला अर्पण केलें व त्या अर्पणपत्रिकेंत "To my friend, G. B. S....... who has filled many lands with laughter" असा त्याचा गौरव करून पुढें आपली आकांक्षा पुढें दिल्याप्रमाणें व्यक्त केली आहे:—"In times like these one often longs for the return, to earth, of one of the laughing philosophers of the past......". त्याच्या आकांक्षेप्रमाणें तसा laughing philosopher त्याच्या डोळ्यांपुढें होता म्हणूनच त्यानें आपलें पुस्तक त्याला अर्पण केलें असलें पाहिजे.

आर्चिबाल्ड हेंडर्सनचें अधिकृत असें विस्तृत चरित्र प्रसिद्ध झाल्यानंतरहि शॉचें दुसरें एक विशेषतः त्या-च्या जीवनांतील बारीकसारीक तपशील देऊन त्याचें व्यक्तिमत्त्व निदर्शनास आणणारें चरित्र हेस्केथ पीअर्सन यानें लिहिलें आहे.त्यांत त्यानें अखेरीस समा-रोप करतांना पुढीलप्रमाणें उद्गार काढले आहेत:— "शॉचें महत्त्व त्याच्या मतांवरून ठरणारें नाहीं; त्याच्यासारखीं मतें इतर कित्येकांचीं असूं शकतील. तें खरोखर त्याच्या विनोदवृत्तीवरूनच ठरतें. विनोद-वृत्ति ही जीवनांतील आनंददायी काव्याप्रमाणें आहे. जीवनाचें अस्तित्व तिच्यामुळेंच समर्थनीय ठरेल. जीवनाचें प्राप्तव्य असा जो आनंद तो विनोद-वृत्तीमुळेंच प्राप्त होणारा आहे आणि या अशा विनोद–वृत्तीची पेरणी शॉनें आपल्या नाट्याच्या सुपीक भूमीमध्यें मनमुराद केली आहे.

"तुम्हीं आपल्या एकाद्या नाटकांत जाणून बुजून आपलें स्वतःचें चित्र रेखाटलें आहे काय?" असें मी एकदां त्यांना विचारलें.







"नाहीं,' ते म्हणाले, ['पण माझ्या सर्वच नाटकात G. B. S. तुम्हांला आढळून येईल.' त्यांच्या नाटकांतील कोणतीहि उदात्त भूमिका घेतली तर तिच्यांत शॉचेच ठळक गुण दिसून येतात याचें कारण हेंच असावें. स्वतः शॉ हाच जगांतील एक दुर्मिळ अशी निर्मिति आहे आणि तीहि श्रेष्ठ प्रतीची आहे. त्याच्या तेजस्वी विनोद–वृत्तीच्या फवाऱ्यांनीं प्रकीशत झालेला काळ हा भावी इतिहासांत 'शॉव्हि-यन युग' म्हणून निःसंशय नमूद केला जाईल".

येथें हीं दोन प्रसिद्ध व्यक्तींच्या जीवनांतील व लिखाणांतील 'विनोद–वृत्ती'चीं उदाहरणें दिलीं आहेत. त्यांत आणखीहि भर घालतां येईल; त्यांत विविधताहि असूं शकेल. पण त्या वृत्तीची आवश्य-कता निदर्शनास आणण्याला इतकीं पुरेशीं होतील असें मला वाटतें.

---

"चर्चिल स्वातंत्र्याचा 'उदो उदो' करतात त्यांत कांहीं अर्थ नाहीं. रूसोनें कल्पना केल्याप्रमाणें आपण स्वतंत्र म्हणून जन्माला आलों नाहीं. निसर्ग हा एक मोठा अरेराव आहे. तो आपणांस काम केल्याशिवाय जगूं देणार नाहीं. कामाशिवाय जीवन आणि योग्य फुरसतीच्या अभावीं संस्कृति अशक्य आहेत. या दोन अटळ गोष्टींना संघटित असें वळण लोकसत्तेच्या द्वारें लावलें पाहिजे. नाहीं तर समाजवादाच्या ऐवजीं झोटिंगशाही आपल्या नशिबीं येईल."

—बर्नार्ड शॉ. 'ट्रिब्यून'मधील लेखांतून. जून, ४८

---

"मुसोलिनी आणि हिट्लर कसे निर्माण झाले? केवळ वावदूक अशा पार्लमेंटविषयीं जनतेचा जो आशाभंग झाला आणि तिला अशा पार्लमेंटबद्दल जो तिटकारा आला, त्यांमधूनच हिट्लर–मुसोलिनी जन्मले. इंग्रजांवर राज्य करण्यांत जी मुख्य अडचण क्रॉमवेलला कळून आली ती म्हणजे त्यांची भांडखोरपणाची खोड."

—बर्नार्ड शॉ, 'ट्रिब्यून', जून १९४८.

# महानुभाव पंथ आणि सामाजिक क्रांति

आचार्य स. ज. भागवत

*महानुभाव पंथासंबंधीं महाराष्ट्रांत गेलीं कित्येक वर्षे, किंबहुना कित्येक तपें, संशोधन आणि अभ्यास चालू आहेत. या संशोधनांत आणि अभ्यासांत कांहीं कांहीं अवस्थाहि आल्याचें आपल्याला आढळून येईल. इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांनीं आपल्या असामान्य बुद्धिसामर्थ्यानें आणि कल्पकतेनें महानुभावीय लोकांच्या ग्रंथांच्या निरनिराळ्या सांकेतिक लिप्या उलगडून काढल्या आणि त्यामुळेंच महानुभाव पंथाच्या अभ्यासाला चालना मिळाली. त्यापूर्वी कित्येक शतकेंपर्यंत महाराष्ट्रांत महानुभाव पंथाच्या साहित्याचा अभ्यास लोपलेला होता.

## महानुभावांविषयीं परंपरागत मत

तथापि महानुभावीयांसंबंधीं महाराष्ट्रांत एक विशिष्ट ग्रह प्रचलित होता व तो इतका बद्धमूल झालेला होता कीं, पुढें संशोधन सुरू झाल्यानंतरहि त्याच बद्धमूल ग्रहाप्रमाणें विचार प्रदर्शित केले गेले. हा ग्रह कशा प्रकारचा होता अथवा आहे हें पाहावयाचें असल्यास त्या पंथावरून मराठींत आलेला ' मानभावी ' हा एकच विशेषणात्मक रूढ शब्द पुरेसा आहे. जर कोणी दुटप्पी अथवा असत्य वर्तन करूं लागला, खोटा आव आणून बोलूं लागला, तर आपण ह्मणतों कीं ' तो मानभावीपणा करीत आहे.' मानभावीपणा, मानभावी वृत्ति वगैरे शब्द महानुभाव या शब्दावरून आलेले आहेत. या सर्वांच्या पाठीमागें दृढ ऐक्य आहे आणि तें म्हणजे ' तुझ्या पोटांत वाईट आहे; पण आम्हांला मात्र चांगलें दाखवितोस.' इतकें या पंथासंबंधीं विपरीत मत कालानें संकलित करून दिलेलें आहे. मराठी साधु-संतांच्या साहित्यांत महानुभावांविरुद्ध अत्यंत त्वेषाचे व तिरस्काराचे उद्गार आढळतात याचें कारण काय, या गोष्टीचा समाजशास्त्राच्या दृष्टीनें विचार झाला पाहिजे. मी अनेक वर्षांपासून या गोष्टीवर विचार करीत आलों आहें आणि त्यासंबंधीं मीं माझ्या मनाशीं कांहीं निर्णयहि घेतले आहेत. तेच मी आज आपल्यापुढें मांडणार आहें.

महानुभाव पंथाचें महाराष्ट्राच्या साहित्यांत काय स्थान आहे, याची चर्चा आजपर्यंत पुष्कळ झालेली आहे. परंतु महाराष्ट्राच्या सांस्कृतिक विकासांत त्या पंथाचें स्थान काय आहे याबद्दल फार थोडी चर्चा झाली आहे व जी झाली आहे ती चुकीच्या दृष्टिकोनांतून झाली आहे, असें मला वाटतें. आणि म्हणून त्या दृष्टिकोनाच्या विरुद्ध मत मी प्रदर्शित करणार आहें. अर्थात् असें करतांना कोणाहि व्यक्तीबद्दल माझ्या मनांत खासगी रागद्वेष अथवा स्पर्धा नाहीं.

## महानुभाव पंथावरील महाराष्ट्रीय संशोधन

महाराष्ट्रांत महानुभाव पंथाबद्दल संशोधन सुरू झाल्यानंतर त्या पंथासंबंधीं जें मतप्रदर्शन करण्यांत आलें तें जुन्या पूर्वग्रहदूषित वृत्तीनें करण्यांत आलें. यामुळें त्यांत चीड, तिरस्कार, त्वेष यांचेंच प्राधान्य होतें.

---

* पुणें येथील वसंतव्याख्यानमालेंत ता. ९-५-४८ रोजीं दिलेल्या व्याख्यानाचा हा सारांश आहे.








अर्थात् अशा प्रकारचें मतप्रदर्शन केल्याबद्दल जुन्या लोकांना दोषहि देतां येणार नाहीं. कारण, पूर्वग्रहांपासून संपूर्णपणें अलिप्त राहणें त्यांना शक्य नव्हतें. त्यांच्यांपैकीं श्री. राजवाडे यांचीं मतें अभ्यासानें बदलत असत. त्यामुळें पुढेंपुढें महानुभाव पंथासंबंधींच्या त्यांच्या मतांत बदल होत गेल्याचें दिसून येतें. श्री. चांदोरकर हे अकालीं मृत्यु पावल्यामुळें त्यांना नवीन संशोधनाचा फायदा मिळूं शकला नाहीं. यामुळें त्यांनीं महानुभावांच्या विरुद्ध प्रखरपणें जीं मतें मांडलीं तीं तशींच राहिलीं. पुढें धुळ्याचे श्री. नानासाहेब देव यांनीं आपल्या 'रामदास रामदासी' या मासिकांत या विषयासंबंधीं असा इशारा देऊन ठेवला कीं ज्यांना महानुभावांसंबंधीं लिहावयाचें अथवा बोलावयाचें असेल त्यांनीं प्रथम श्री. चांदोरकरांच्या लेखांचें खंडन तरी केलें पाहिजे, नाहीं तर त्यांचीं विधानें मान्य तरी केलीं पाहिजेत. पूर्वी एकदां महानुभावांसंबंधीं इकडील कोर्टांत वाद सुरू झाला होता. त्यांत श्री. भांडारकर हे महानुभावांना अनुकूल व श्री. पांगारकर हे प्रतिकूल होते. परंतु नंतर पांगारकरांनीं आपल्या साहित्याच्या इतिहासांत महानुभावांसंबंधीं फार उदारपणें लिहिलेलें आहे. श्री. विनायकराव भावे यांनींहि खूप मेहनत करून, महानुभावीय महंतांना जवळ करून संशोधन केलें, त्यांत त्यांचें प्रारंभींचें मत बदललें. हा सर्व इतिहास फार महत्त्वाचा आहे.

सुमारें पंचवीस वर्षांपूर्वी श्री. यशवंत खुशाल देशपांडे यांनीं 'महानुभाव-वाङ्मयाचा इतिहास' या नांवाचें एक पुस्तक प्रसिद्ध केलें. तेव्हांपासून महानुभाव-साहित्याच्या अभ्यासाला नवी दिशा मिळाली. त्यानंतर श्री. नेने व प्रा. कोलते यांचे लेख प्रसिद्ध झाले आणि याप्रमाणें या विषयाला जोराची चालना मिळाली.

१९४०च्या सुमारास नागपुरच्या हायकोर्टांत महानुभावांसंबंधीं एक खटला गेला. त्या वेळीं जस्टिस पुराणिक यांनीं असा निर्णय दिला कीं महानुभावी हे वैदिक सनातनी हिन्दूच आहेत.

पुष्कळ लोक असें म्हणतात कीं ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास, तुकाराम वगैरे चारित्र्यवान् साधुसंतांनीं महानुभाव हे पाखंडी व तिरस्करणीय आहेत असा एकमतानें निर्णय देऊन टाकला आहे. तेव्हां आतां त्यासंबंधीं विचार करण्याची तरी काय जरूरी आहे?

कै. बाळकृष्ण अनंत भिडे यांनीं आपल्या इतिहासांत महानुभावांना शक्य तितका न्याय देण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु सरतेशेवटीं त्यांनीं असेंहि म्हणून ठेवलें आहे कीं ज्याअर्थी महानुभावांवर इतक्या मोठमोठ्या विचारवंतांनीं आक्षेप घेतले आहेत त्याअर्थी त्या आक्षेपांत कांहीं तथ्य असलेंच पाहिजे.

श्री. य. खु. देशपांडे यांनीं महानुभाव हे वैदिकच आहेत व ते साधुसंतांचेंच कार्य करीत होते, असें प्रतिपादून त्यांच्यावरील आळ घालविण्याचा प्रयत्न केला आहे.

श्री. रामभाऊ रानडे यांनीं आपल्या 'मिस्टिसिझम इन महाराष्ट्र' या पुस्तकांत या नवीन विचारकांचा उल्लेख 'दि मॉडर्न ॲपॉलॉजिस्ट्स्' असा केला आहे. त्यावरून त्यांना हें नवीन मत पटलेलें नसावें असें वाटतें.

आतां प्रश्न असा उरतो कीं श्री. य. खु. देशपांडे, नेने, कोलते वगैरे आधुनिक विचारवंत जे निष्कर्ष काढतात ते जुन्या संतांना व श्री. चांदोरकर, पांगारकर वगैरे विचारकांना कां मान्य झाले नाहींत? या बाबतींत माझें मत असें आहे कीं महानुभाव पंथ हा खरोखरीच अवैदिक आहे व त्यामुळें नवीन विचारक जे निष्कर्ष काढतात ते मला मान्य नाहींत. आजच्या व्याख्यानाचा विषय 'महानुभाव पंथाचें ऐतिहासिक कार्य काय?' अशा अर्थाचा आहे. यामुळें समाजक्रांतीसंबंधीं माझीं स्वतःचीं मतें कांहींहि असलीं तरी तीं मी या विषयांत घुसडून देणार नाहीं. माणसानें कोठलाहि बाह्य पुस्तकी अथवा व्यक्तिविषयक प्रामाण्यवाद स्वीकारूं नये, बुद्धिप्रामाण्य अथवा आत्मप्रामाण्यच मानावें असें माझें मत आहे. तरी पण आज आपल्या समाजांत ज्या सुधारणा चालू आहेत, त्यांचा जिवंत विचार महानुभाव पंथाचे संस्थापक चक्रधर यांच्या साहित्यांत आढळतो. म्हणून मी या विषयाकडे वळलों असल्यामुळें माझें मन त्या बाबतींत संपूर्णपणें तटस्थ अथवा निर्लेप नाहीं हें मला कबूल करावयास हरकत नाहीं.

# महानुभाव पंथ आणि सामाजिक क्रांति

## महानुभाव हे अवैदिक

कमींत कमी गेल्या तीन हजार वर्षांपासून हिंदुस्थानांत वैदिक आणि अवैदिक या संस्कृतींमध्यें झगडा आहे. यांपैकीं वैदिक संस्कृतीचें समाजशास्त्र हें चातुर्वर्ण्यावर म्हणजेच विषमता व अहंकार यांवर आधारलेलें आहे. ही संस्कृति नेहमींच समतेशीं वैर करीत आलेली आहे. तिचीं मूल्येंच मुळीं विषमतेवर उभारलेलीं आहेत. यामुळें तिच्या मूल्यांशीं सतत झगडत राहणारा एक प्रवाह भारतीय संस्कृतींत अगदीं प्रारंभापासून आढळतो. भारतीय संस्कृतीच्या अभ्यासकांनीं या दोन्ही प्रवाहांचा तटस्थपणें अभ्यास केला पाहिजे व त्यांचा आढावा घेतला पाहिजे. या दोन प्रवाहांचा संगम व्हावा अशा दृष्टीनें प्रयत्न करणारा एक मध्यस्थांचा प्रवाहहि आपल्या देशांत चालत आला आहे, त्याचाहि अभ्यास झाला पाहिजे. परंतु अशा प्रकारें तटस्थ राहून अभ्यास करण्याची वृत्तीच महाराष्ट्रांत फार दुर्मिळ आहे. आपण अभ्यास करतांनाहि कोठल्या तरी एका पक्षाशीं स्वतःला बांधून घेतों आणि पूर्वग्रहदूषित होऊन संशोधन करूं लागतों. ही वृत्ति आपण सोडली पाहिजे. निदान ज्ञानक्षेत्रांत तरी आम्ही पक्षाभिनिवेश बाळगणार नाहीं, आम्हांला मान्य नसलेल्या पक्षांचा व क्षेत्रांचाहि अभ्यास आम्ही निर्लेप मनानें करूं असें आपण यापुढें ठरविलें पाहिजे.

वस्तुतः महानुभाव हे अवैदिक आहेत म्हणून आपणांला त्यांच्याबद्दल तिरस्कार वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. त्यांच्यासंबंधीं खरी माहिती मिळविण्याचा आपण तटस्थपणें प्रयत्न केला पाहिजे.

वेदविरोधी तंत्रांत बसणारा महानुभाव हा कांहीं एकटाच पंथ नव्हे. बौद्ध, जैन व लिंगायत हेहि याच तंत्रांतील पंथ आहेत. यामुळें जुने संत जेव्हां पाखंड्यांचा उल्लेख करतात, तेव्हां ते या चारी पंथांचा एकत्र उद्धार करतात असें आढळून येतें. अर्थात् साधुसंतांनीं या लोकांना कां शिव्या दिल्या याचा नीट उलगडा व्हावा असें वाटत असेल तर आपण वैदिक व अवैदिक परंपरा म्हणजे काय, त्यांचीं मतें काय, त्यांच्या विचारांत काय फरक आहे व त्यांचीं मूल्यें एकमेकांहून कशीं भिन्न आहेत यासंबंधीं विचार केला पाहिजे. अवैदिक वाङ्मयांत वैदिकांना व विशेषतः वैदिकांचे पुढारी जे ब्राह्मण त्यांना जशा शिव्या दिलेल्या आढळतात, तशाच किंबहुना त्यांहूनहि जास्त शिव्या ब्राह्मणांनीं या अवैदिकांना दिलेल्या आहेत. यावरून हेंच दिसून येईल कीं हा सगळा वैदिक नि अवैदिक यांच्यांतील झगडा आहे.

महानुभाव हे अवैदिक आहेत हें माझें मत जर खरें ठरलें (आणि तें खरें आहे याबद्दल मला मुळींच शंका नाहीं) तर महानुभावांच्या बाबतींतील राजवाडे, चांदोरकर, बा. अ. भिडे वगैरे जुन्या मंडळींचें म्हणणें जास्त बरोबर होतें आणि य. खु. देशपांडे, कोलते वगैरे नवीन मंडळींचें म्हणणें चूक आहे असें सिद्ध होईल. अर्थात् जुन्या मंडळींनीं महानुभावांना ज्या शिव्या दिल्या त्या मला मुळींच मान्य नाहींत. कारण, त्यांचें मूल्यमापनच मला मान्य नाहीं. अर्थात् त्यांनीं महानुभावांना अगदीं तळतळाटून ज्या शिव्या दिल्या त्यांतच महानुभावांचें श्रेष्ठत्व आहे. कारण, शिव्या देणारे हे विषमतावादी वैदिक संस्कृतीचे पाठीराखे होते.

## चक्रधर हा बुद्धिवादी व समताप्रेमी

हल्लीं आपण जेव्हां समाजसुधारकांसंबंधीं विचार करतों तेव्हां आपण जास्तींत जास्त आगरकर, लोकहितवादी आणि ज्योतिराव फुले यांच्यापर्यंत जाऊन पोंचतों. परंतु आज आपण जे लोक जातिरहित व वर्गरहित समाजाच्या (Casteless and classless Societyच्या) स्थापनेचा विचार करीत आहों व त्यासाठीं झगडत आहों त्या सर्वांना मला एक आनंदाची बातमी सांगावयाची आहे कीं, अशाच प्रकारचे विचार बाळगणारा व त्यांसाठीं झगडणारा एक महापुरुष ज्ञानेश्वरांच्याहि पूर्वी आपल्या महाराष्ट्रांत होऊन गेला. अर्थात् हा मूळचा महाराष्ट्रीय नसून गुजरातमधून इकडे आला होता. याचें नांव चक्रधर. महानुभाव पंथाचा मूळ संस्थापक तो हाच. हा जरी गुजराती असला तरी त्याला महाराष्ट्राविषयीं फार प्रेम वाटत होतें. तो म्हणतो कीं, 'तेलंगणांत जाऊं नये, कर्नाटकांत जाऊं नये, इतर कोणत्याहि देशांत जाऊं नये; पण महाराष्ट्रांत मात्र अवश्य जावें.' महाराष्ट्राबद्दल त्याला इतका








'आदर व आपलेपणा असूनहि आपण मात्र त्याला चारित्र्याच्या दृष्टीनें पार मारून टाकलें ! आपण त्याच्या शीलावर शिंतोडे उडवून त्याला बदनाम केलें ! परंतु त्यासाठीं ऐतिहासिक पुरावा मात्र दिला नाहीं. तो आणि त्याचे अनुयायी बदनाम व बदचलन होते हें गृहीत धरूनच आजपर्यंत टीका करण्यांत आली. ती मूलतःच चूक आहे. जर ती गोष्ट खरी असेल तर तसा सबळ ऐतिहासिक पुरावा देऊन आपण ती सिद्ध केली पाहिजे. मला मात्र तें मुळींच खरें वाटत नाहीं. चक्रधर हा अहिंसक, धैर्यशाली, स्वतंत्रबुद्धिवादी व समताप्रेमी होता. परंतु त्याची परंपरा आपल्या येथें वाढूं शकली नाहीं याचें कारण, महाराष्ट्र हा पूर्वीपासून कडक ब्राह्मण्याच्या ( Brahmin supremacyच्या ) अंकित आहे. त्याच्या पकडींतून सुटणें सामान्य जनतेला कठिण झाले आहे आणि ज्या ज्या वेळीं कोणीं तसा प्रयत्न केला आहे त्या त्या वेळीं ब्राह्मणांनीं साधेल त्या मार्गानें त्याचा निकाल लावला आहे. ही घटना अत्यंत दुःखपूर्ण आहे. कारण, तीमुळें समाजाला नेहमींच अडथळा होत राहिला आहे. तेव्हां विषमतावादी वैदिकांनीं व ब्राह्मणांनीं चक्रधरांना बदनाम करून त्या पंथाचा नायनाट करण्यासाठीं कंबर कसली असल्यास त्यांत कांहींच आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं.

## वेदांसंबंधींची अढी

परवां मी नागपुरला गेलों असतां, त्या ठिकाणीं श्री. बाळकृष्णशास्त्री महंत नांवाच्या एका महानुभावीय संन्याशांनीं स्वतः लिहिलेलें 'महानुभाव पंथ' नांवाचें पुस्तक मला दिलें. तें मीं तावडतोब वाचून काढलें. त्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत श्री. य. खु. देशपांडे यांनीं पुनः पुनः असें ठासून सांगितलें आहे कीं महानुभाव हे वैदिकच आहेत. आणि पुस्तकाच्या शेवटीं त्याच अर्थाचा जस्टिस पुराणिक यांचा निवाडाहि छापला आहे. पण जेव्हां मी श्री. महंत यांच्याशीं बोललों तेव्हां ते म्हणाले कीं "तुमचेंच म्हणणें बरोबर आहे. आम्ही महानुभाव वैदिक नाहीं. आम्ही असें मानतों कीं वेद हे ईश्वराच्या निःश्वासांतून निघालेले नसून ते ऋषींनींच लिहिलेले आहेत व ऋषी हे जीव असल्यामुळें अल्पज्ञ आहेत आणि म्हणूनच त्यांचीं मतें अेकमेकांशीं जुळत नाहींत. आम्ही भगवद्गीता मानतों, परंतु 'सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनन्दनः' ही भूमिका मानीत नाहीं. श्रीकृष्ण हा परमेश्वरी अवतार होता अशी आमची श्रद्धा आहे म्हणून आम्ही त्यालाच मानतों." यावर मी त्यांना म्हणालों कीं "तुम्ही अवैदिक आहां यावद्दल मी तुमचें अभिनंदन करतों. पण तुम्हीं तुमचीं मतें ठामपणें सांगितलीं पाहिजेत; मग त्यासाठीं गोळ्या खाव्या लागल्या तरी हरकत नाहीं. अितर लोक काय म्हणतील या भीतीनें जर तुम्हीं तुमचीं प्रामाणिक मतें दडपून टाकलीं तर ती राष्ट्राची फार मोठी हानि होईल." नंतर माझ्या मनांत असा प्रश्न आला कीं महंतानीं आपलीं मतें कां दडपून टाकलीं असावीं ? त्याचें उत्तर मला असें सुचलें कीं आपल्या लोकांत अद्यापि परमतसहिष्णुता न आल्यामुळें त्यांना तसें करावें लागलें असावें. अर्थात् त्यांच्या मनांतील वेदांसंबंधींची अढी सरळपणें प्रकट न होतां वेगळ्या मार्गानें प्रकट झालेली आहे. त्यांनीं आपल्या पुस्तकांत वेदव्यास हा चांडाळ होता असें सिद्ध करण्याची धडपड केली आहे. वस्तुतः या गोष्टीचें त्या ठिकाणीं कांहींच प्रयोजन नव्हतें. परंतु वेदांना सरळसरळ विरोध करण्याचें धैर्य न झाल्यामुळें त्यांच्या मनानें हें आडवळण पत्करलें.

## श्रीकृष्णाहि वैदिक नव्हे

आतां प्रश्न असा उरतो कीं जर हा पंथ वैदिक नव्हे, तर त्याचें श्रीकृष्णप्रेम हें कोठलें ? यासंबंधीं माझें असें उत्तर आहे कीं श्रीकृष्ण हा स्वतःच वैदिक नव्हे. कृष्णचरित्रांत असें सांगितलें आहे कीं कृष्णाचें इन्द्राशीं भांडण होतें आणि इन्द्र हा आर्यांचा पुढारी होता. डॉक्टर सर्वपल्ली राधाकृष्णन् यांनीं असें म्हटलें आहे कीं इन्द्र ही आर्यांच्या साम्राज्यवादी वृत्तीची द्योतक देवता होती. याचा अर्थ श्रीकृष्ण हा आर्यांच्या वर्चस्वाच्या विरुद्ध होता, तो यज्ञाच्या विरुद्ध होता, कर्मकांडाच्या विरुद्ध होता. भगवद्गीतेंत वेदविरोधी वचनें भरपूर आहेत. सारांश, इन्द्र नि कृष्ण यांच्यांतील भांडण हा उच्चवर्णीय नि नीचवर्णीय यांच्यांतील लढा होता. त्या लढ्यांत श्रीकृष्णापुढें टिकाव न लागल्यामुळें ब्राह्मणांनीं त्यालाच वैदिक करून घेतलें आणि







इन्द्राला बहिष्कृत केलें, इतकें कीं त्या इन्द्रांचें देऊळहि कोठें आढळत नाहीं.

सर्व सन्तांची कृष्णभक्ति सारखीच होती असें समजण्याचेंहि कारण नाहीं. सूरदासाची कृष्णभक्ति उन्मत्त होती, तर एकनाथाची कृष्णभक्ति संयमी व मर्यादित होती. त्याचप्रमाणें सगळ्या संतांची नैतिक भूमिका व समाजविषयक मूल्यें सारखींच होतीं असेंहि म्हणतां येणार नाहीं. तुलसीदास–रामदासांसारखे संत ब्राह्मण्याचे कडवे अभिमानी होते. दादू, कबीर, चैतन्य ही मंडळी जातिभेद मुळींच न मानणारी होती.

## सामाजिक क्रांति

जातिभेद, अस्पृश्यता व सामाजिक विषमता न मानणारा चक्रधर गुजरातेंत निर्माण झाला हाहि एक मोठा मजेशीर योग समजला पाहिजे. कारण, त्याच गुजरातेंतून सामाजिक विषमता नष्ट करण्यासाठीं झगडणारे स्वामी दयानंद सरस्वती आणि महात्मा गांधी निर्माण झाले. या तिघांचीहि मतें कित्येक बाबतींत समान होतीं असें आढळून येतें. चक्रधरानें सांगितलेल्या कित्येक गोष्टी बाराव्या शतकांतच नव्हे तर आज विसाव्या शतकांतहि सामान्य माणसाच्या बुद्धीला धक्का देणाऱ्या होत्या नि आहेत. चक्रधर हा चातुर्वर्ण्य न मानणारा व जातिभेद न पाळणारा होता, यामुळें महानुभाव पंथांतील संन्यासी चारहि वर्णांच्या लोकांकडून मद्यमांसविवर्जित भिक्षा घेऊं शकतो.

हिंदुधर्मानें व त्यांतील साधुसंतांनीं बुद्धीनें अद्वैतवाद मान्य केला, परंतु प्रत्यक्ष व्यवहारांत मात्र ते चातुर्वर्ण्याची चौकट मोडूं शकले नाहींत. आपल्याकडे फक्त ब्राह्मणच शंकराचार्य होऊं शकतो, तो संन्यासी असूनहि अस्पृश्यता पाळतो व ब्राह्मणांशिवाय इतरांच्या हातचें खात नाहीं. येवढेंच नव्हे तर त्यांत भूषण मानतो. महाराष्ट्रांतलि वारकरी–संप्रदायानें व त्यांच्या विद्वान् पुढाऱ्यांनींहि गांधीजींच्या अस्पृश्यता–निवारणाच्या चळवळीला कसून विरोध केला. महानुभावांनीं ही जातीयतेची कोंडी फोडली होती. त्यांनीं रोटीबेटी–व्यवहारावर कसलेंहि बंधन घातलें नव्हतें, सर्वांना ज्ञानाचा समान अधिकार आहे हें मान्य केलें होतें. यामुळें त्यांच्या आश्रमांत ब्राह्मण, अस्पृश्य, स्त्री–पुरुष सर्वजण एकत्र राहत असत. परंतु हें महाराष्ट्राच्या दृष्टीला खपलें नाहीं व त्यामुळें त्यांनीं या पंथावर जोराचा हल्ला चढविला.

## एक भयंकर विषय !

चक्रधरानें अशी एक विलक्षण बुद्धिप्रधान गोष्ट सांगितली होती कीं जी आजपर्यंत कोठल्याहि संतानें अथवा सुधारकानें उच्चारण्याचें धाडस केलेलें नाहीं. ती म्हणजे रजस्वला स्त्रीचा विटाळ मानण्याचें कांहीं कारण नाहीं ही होय. अर्थात् ही गोष्ट वसंतव्याख्यानमालेसारख्या पवित्र ठिकाणीं उच्चारणें किती धोक्याचें आहे याची मला कल्पना आहे. परंतु माझा आपणांला असा सवाल आहे कीं आज आपल्या सर्वांच्या घरांत काय चाललें आहे ? आमच्या मुलीबाळी मासिक विटाळ पाळीत नाहींत हें आम्हांला धडधडीत दिसत आहे. परंतु त्यासंबंधीं उघडपणें चर्चा करण्याची हिंमत मात्र आम्हांला होत नाहीं. अर्थात् जर स्त्रियांनीं पूर्वीप्रमाणेंच विटाळ पाळणें हे योग्य व धर्म्य असेल तर तसें शास्त्रदृष्ट्या व नैतिकदृष्ट्या आपण सिद्ध केलें पाहिजे आणि त्याप्रमाणें त्या नियमाचें कडकपणें पालन केलें पाहिजे. पण आज जें ढोंग चाललें आहे तें चालतां कामा नये. मला वाटतें कीं या बाबतींत गांधीजींनीं जो निर्णय दिला होता तो आपल्यापैकीं विचारवंतांना मान्य होण्यासारखा आहे. तो असा कीं रजस्वला स्त्रियांनीं स्वच्छता, विश्रांति व ब्रह्मचर्य या तीन गोष्टी संपूर्णपणें पाळून कांहींहि करण्यास हरकत नाहीं. याचा अर्थ या गोष्टींतील अस्पृश्यता हें थोतांड असून तें नष्ट झालें पाहिजे. अर्थात् इतका भयंकर विषय बाराव्या शतकांत उघडपणें बोलून दाखविणारा मनुष्य हलकट ठरला असल्यास त्यांत आश्चर्य वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. मला मात्र असें वाटतें कीं अशा प्रकारें स्वतंत्रपणें विचार करणारा एक क्रांतिकारक बाराव्या शतकांत आपल्याकडे होऊन गेला ही आपणांला मोठी अभिमानाची गोष्ट आहे. आणि म्हणून आपणांला माझी अशी विनंति आहे कीं सामाजिक क्रांतीमध्यें महानुभावांनीं जें कार्य केलें आहे त्याचा अभ्यास आपण तटस्थपणें करावा.



अनुक्रमणिका

# महानुभाव पंथाचें अवैदिकत्व

प्रा. वि. भि. कोलते

महानुभाव पंथ हा वैदिक आहे की,+अवैदिक आहे यासंबंधी आजपर्यंत बराच ऊहापोह झालेला आहे. निरनिराळ्या विद्वानांनी या प्रश्नावर परस्पर-विरोधी मते व्यक्त केलेली आढळतात. मी स्वतः 'महानुभाव पंथ आणि वेदप्रामाण्य' या नांवाचा एक लेख लिहून ( वागीश्वरी, वर्ण ४, विलास ३; जुलै १९३३ ) त्यात महानुभाव हे वेदांना प्रमाण मानणारे आहेत असे मत व्यक्त केले होते. 'भास्कर-भट्ट बोरीकर' ( १९३५ ) या पुस्तकांतहि मी तेच मत मांडले आहे. या दोन्ही प्रसंगी महानुभावांचे काव्यग्रंथच काय ते माझ्यासमोर होते. त्यांच्या तत्त्व-ज्ञानाशी परिचय नसल्यामुळें कांहीं ओव्यांचा अर्थ लावण्यांत देखील माझ्याकडून चूक झाली. त्यानंतर महानुभावांच्या तत्त्वज्ञानाचा त्यांचा मूळ स्थळ-भाष्य आदि ग्रंथावरून अभ्यास करण्याची संधि मला मिळाली; त्यांच्या तत्त्वज्ञानाची बैठक मला समजून घेतां आली. तात्त्विक ग्रंथांतील वेदोपनिषदांसंबंधीचे उल्लेखहि पाहण्यात आले. आणि त्यावरून माझे जे मत बनले ते येथे मांडायचे आहे. महानुभाव पंथ हा वेदांविषयी आदर बाळगणारा असला तरी तो वेदांना प्रमाण मानणारा नाहीं; अर्थात्, या दृष्टीने तो अवैदिक पंथ आहे असा माझ्या या मताचा सारांश थोडक्यात सांगता येईल.

## ईश्वरावतारांची वचने प्रमाण

महानुभावांना आपल्या आचार-विचारांच्या बाबतीत जर कुणाची वचने 'प्रमाण' असतील तर ती फक्त परमेश्वरावतारांची ! इतरांची वचने ते मुळीच प्रमाण मानीत नाहीत. त्यांच्या दृष्टीने असे परमेश्वरावतार पाच आहेत. त्यांनाच ते 'पंचकृष्ण' म्हणून संबोधतात. श्रीदत्तात्रेय, श्रीकृष्ण, श्रीचक्र-पाणी, श्रीगोविंदप्रभु व श्रीचक्रधर यांचा त्यात समावेश होतो. अर्थात्, या पाचांचीच वचने त्यांना प्रमाणभूत होत; इतरांची नव्हेत. श्रीदत्तात्रेय आणि श्रीचक्रपाणी यांचा उपदेश स्वतंत्र रीतीने उपलब्ध नाही. खास श्रीचक्रपाणीची म्हणून जी वचने थोडीफार आहेत ती अर्थात्च महानुभावांना प्रमाण म्हणून मान्य आहेत. भगवान् श्रीकृष्णाची 'गीता' तर ते प्रमाणग्रंथ म्हणून मानतातच. 'वाइ: गीता श्रीकृष्णोक्ति: एर अवघी व्यासोक्ति' ( वि. मा. १०९ ) असे प्रमाणपत्र श्रीचक्रधरस्वामींनी गीतेला दिले आहे. याचा वास्तव अर्थ श्रीकृष्णोक्ति तीच खरी गीता. गीतेतील इतर भाग व्यासोक्ति होय. म्हणून भगवद्गीतेतहि श्रीकृष्णाच्या मुखीची जी वचने आहेत तीच महानुभावांना प्रमाण आहेत हे सांगायलाच नको. आणि ती वचनेही खरोखरच परमेश्वरावतार श्रीकृष्णाची वचने आहेत असे प्रशस्ति-पत्रक श्रीचक्रधरस्वामींनी दिलेले असल्यामुळे तर त्यांच्या प्रामाण्याविषयी शंकाच नाही.

राहिलेल्या दोन अवतारांपैकी श्रीगोविंदप्रभु हे उभयदृश्यावतार असले तरी त्यांचा अवतार 'वेडा-पिसा' होता; तसेच त्यांचे वर्तन होते. आचार-विचारपर अशी ज्ञानवचने त्यांनी फारशी उच्चारलेलीच नाहीत. पण जी आहेत ती अर्थात् महानुभावांना प्रमाण म्हणून मान्य आहेतच. याचे एक मोठे सुंदर उदाहरण प्रसिद्ध आहे. 'मातापुरा

+ लेखकाच्या इच्छेनुसार हा लेख अनुच्चारित अनुस्वार काढून छापला आहे. —का. सं.








कोल्हापुरा न वचावे' (आचार २५) अशी श्रीचक्रधरस्वामींची आज्ञा आहे. पण त्यांच्या अविद्यमानी श्रीगोविंदप्रभूंनी नागदेवाचार्यांना 'आवो मेला जाए: मातापुरासि जाए म्हणे' (गोविंदप्रभुचरित्र ३२३; स्मृ. स्थ. पा. ९५) अशी आज्ञा केली. श्रीगोविंदप्रभु हे श्रीचक्रधरस्वामींनाहि वंद्य असल्यामुळें श्रीचक्रधरस्वामींची निषेधपर आज्ञा मोडूनहि नागदेवाचार्यांनी श्रीप्रभूंची आज्ञा प्रमाण मानली आणि त्याप्रमाणे ते मातापुरला गेले. आजहि त्यांच्या त्या आज्ञेचा आधार घेऊनच महानुभाव महंत माहूरला जात असतात. यावरून श्रीगोविंदप्रभूंच्या वचनांना महानुभावांच्या दृष्टीने असलेले प्रामाण्य लक्षात येईलच.

### चक्रधरांच्या वचनांना विशेष प्रामाण्य

आणि श्रीचक्रधरस्वामी हे तर महानुभावपंथाचे संस्थापकच आहेत. ते उभयदश्या परमेश्वरावतार होत अशी सर्व महानुभावांची श्रद्धा आहे आणि म्हणून त्यांच्या वचनांना प्रामाण्य आहे; इतकेंच नाही तर पंचकृष्णांमध्यें श्रीचक्रधरस्वामींचा अवतार हा सर्वश्रेष्ठ अवतार होय. कारण त्यांना फक्त जीवोद्धरणाचेच व्यसन होते, असे महानुभाव महंत मानीत असल्यामुळे त्यांच्या वचनांचे प्रामाण्य विशेष होय. श्रीचक्रधरस्वामींनी संन्यासदीक्षा घेतल्यानंतर आपले सर्व आयुष्य आपल्या अनुयायांना आपले विशिष्ट तत्त्वज्ञान व आचारधर्म यांची शिकवण देण्यातच घालविले. त्या निमित्ताने त्यांनी केलेला उपदेश, केसोबासांनी संकालित करून ठेवलेल्या सूत्रपाठांत अंतर्भूत झालेला आहे. ती सूत्रे अथवा वचने हीच प्रामुख्याने महानुभावांना प्रमाण आहेत. त्यांत न आलेली पण लीलाचरित्रांत 'श्रीमुखोक्त' म्हणजे श्रीचक्रधरांच्या तोंडी असलेली वचनेहि महानुभावांना प्रमाण होत हे सांगितले पाहिजे. सारांश, श्रीचक्रधरस्वामींची वचने व गीतेतील श्रीकृष्णोक्ती यांनाच महानुभावांच्या दृष्टीने प्रामाण्य आहे.

### महानुभावांची पाच 'प्रमाणे'

यांशिवाय इतर कांहीं ग्रंथांना किंवा उक्तींना त्यांच्या दृष्टीने प्रामाण्य आहे की नाही ? अर्थात आहे ! वैदिकांना ज्याप्रमाणें प्रामुख्याने वेदांचीच वचने प्रमाण असली तरी स्मृत्यादि ग्रंथांनाहि ते प्रमाण मानतात, त्याप्रमाणे महानुभावांना प्रत्यक्ष श्रीमुखांची वचने, अर्थात् परमेश्वरावतारांच्या उक्ती (=श्रुति) ह्याच मुख्यत्वे प्रमाण म्हणून मान्य असल्या तरी गौणत्वाने का होईना पण नागदेवाचार्यादिकांच्या वचनांनाहि (=स्मृतींनाहि) ते प्रमाण मानतात. सिद्धांते हरिबास आणि धाकटे सोंगोबास यांच्या 'अन्वयस्थळां'त आरंभीच पुढील उल्लेख आढळतो:—

"आनुसरलिया मार्गिका च्यारि प्रमाणे: श्रुति १ : स्मृति २ : वृद्धाचार ३ : मार्गरूढि ४ : सर्वज्ञाचे श्रीमुख ते श्रुति ॥ भटाचे वर्तमान ते स्मृति ॥ रामेश्वरबा : परसरामबा : हरदमुनिबास : हीराइसे : नागाइसे : हा वृद्धाचार ॥ ॐकारबास : धारासिव अचळ मुरारीबास : सिद्धान्ते हरिबास : गुजर सिवबासापर्यंत मार्गरूढ : मग ऐलाडी काही जीवहेतु संचरला म्हणौनि हे च्यान्हीं सकळ मार्गासी प्रमाणे ॥"

दत्तोमुनी दुतोंडे यांच्या अन्वयस्थळात असाच पण किंचित् निराळा उल्लेख आहे. तो असा:——

"वैद्य दत्तोबासी म्हणितले : परमेश्वराचे श्रीमुखोक्त निरूपण ते श्रुती : भटा बाइसा माहादाइसा म्हाइभटा उपाध्या एवमादिकाचे निरूपण ते स्मृती : भटाचे सिक्ष बाइदेवोबा : पंडित : केशवदेव : कवीश्वर : आनोबास एवमादिकाचे निरूपण ते वृद्धाचार : कवीश्वरादिकाचे शिष्य परशरामबास : रामेश्वरबास : वासुदेवभट : नागनाथबास : हिरण्यगर्भबास : कवि मालोबास : एवमादिकाचे निरूपणे ते : परशरामबासादिकाचे शिष्ये पेटे हरिबास तयाचे अचळ मुरारीबास आन तयासमान जैसे ओंकारबास : नायंबास : पाटकुले मालोबास एवमादिकाचे निरूपण ते मार्गरूढ : अचळादिकाचे शिष्य जैसे शिवबास : जैसे विसोबास : बहाळे नारोबास एवमादिकाचे निरूपण ते वर्तमान : या पांचा प्रमाणी जो अर्थ—निर्धार तोचि यथार्थ."

### 'स्मृती'ला म्हणजे नागदेवांच्या वचनांना प्रामाण्य का ?

यावरून श्रुति, स्मृति, वृद्धाचार, मार्गरूढि व वर्तमान अशी ही पाच 'प्रमाणे' महानुभावांना

मान्य असल्याचे दिसून येईल. त्यातहि जसजसे मागे जावे तसतसे प्रामाण्य अधिक. म्हणजे वर्तमानापेक्षा मार्गरूढीला प्रामाण्य अधिक. मार्गरूढीपेक्षा वृद्धाचाराला प्रामाण्य अधिक. त्याचप्रमाणे वृद्धाचारापेक्षा स्मृतीला आणि स्मृतीपेक्षाहि श्रुतीला अर्थात् परमेश्वराच्या श्रीमुखोक्ताला सर्वांत अधिक प्रामाण्य आहे. स्मृतीला म्हणजे प्रामुख्यानें नागदेवाचार्यांच्या वचनांना प्रामाण्य का ? हा प्रश्न विचारण्यासारखा आहे. त्याचे उत्तर असे की नागदेवाचार्य हे श्रीचक्रधरनिरूपित शास्त्रात इतके पारंगत झाले होते की त्यांच्या तोंडून त्या शास्त्राला सोडून असे काहीहि निघणे अशक्य होते. या बाबतींत प्रत्यक्ष चक्रधरस्वामींनी नागदेवाचार्यांना प्रशस्तिपत्रक दिले होते. 'तुझेनि मुखे अशास्त्रीय न नीगे की' (विचार, १५९) असे ते खुद्द नागदेवांना म्हणाले होते. 'बाई हा काही आपुलें बोलैल : हा एथिचेंचि बोलैल की' (विचार, १६०) अशी नागदेवाचार्यांची स्तुती स्वामींनी बाइसाजवळ केली होती. खास चक्रधरस्वामींची ही प्रशस्तिपत्रकें असल्यामुळे नागदेवाचार्यांच्या उक्तीला प्रामाण्य यावे यात आश्चर्य नाही. 'भटोबासांचे बोलणे ईश्वरवाणि की' असे केशीबास कवीश्वरबासाजवळ (भास्करभट्ट बोरीकराजवळ) म्हणाले होते. यावरूनहि स्मृतीला म्हणजे नागदेवाचार्यांच्या उक्तींना महानुभाव पंडित कसे प्रमाण मानीत होते ते दिसून येईल. या मार्गपरंपरेच्या शास्त्रात पारंगत बनलेल्या इतर आचार्यांच्या उक्तींना प्रामाण्य मिळण्याचेहि कारण यावरून सहज लक्षात येऊं शकेल.

## वेद अप्रमाण आहेत

या सगळ्या विवेचनाचा भावार्थ असा की महानुभाव महंतांना त्यांच्या स्मृति–वृद्धाचारादिकांतील उक्ती प्रमाण आहेत याचे मुख्य कारण त्या परमेश्वरोक्तिला धरून आहेत. तेव्हां त्यांचे मुख्य प्रमाण म्हणजे परमेश्वरावताराची, अर्थात् प्रामुख्याने श्रीचक्रधरस्वामींची वचने होत. आणि स्वामींनी 'प्रमाण' म्हणून सांगितल्यामुळे अर्थात् भगवद्गीतेतील श्रीकृष्णाच्या तोंडची वचनेहि 'प्रमाण' होत. याशिवाय ते इतर कोणाला किंवा कोणाच्या ग्रंथांना प्रमाण मानीत नाहीत हे ओघानेच दिसून येते. तेव्हां महानुभाव पंथ हा वेदांना प्रमाण मानीत नाही हे यावरून स्पष्ट होत नाही काय ?

## महानुभाव तत्त्वज्ञानाची भूमिका

श्रीचक्रधरस्वामींनी आपण स्वतः उपदेशिलेल्या ब्रह्मविद्याशास्त्राविषयी व वेदांतादि इतर शास्त्रांविषयी काही उद्गार काढलेले आहेत त्यांवरून व त्यांवर त्यांच्या शिष्यांनी केलेल्या भाष्यावरून काय दिसून येते ते थोडक्यात पाहू. त्यासाठीं महानुभाव पंथाच्या तत्त्वज्ञानाची बैठक लक्ष्यात घेणे अवश्य आहे. सृष्टीत जीव, देवता, प्रपंच व परमेश्वर या चार मुख्य वस्तू असून त्यातील जीव हे बद्धमुक्त, देवता ह्या नित्यबद्ध, परमेश्वर हा नित्यमुक्त आणि प्रपंच जड आहे. प्रपंच जड असल्यामुळे त्याच्या मुक्तीचा प्रश्नच उद्भवत नाहीं. देवता या नित्यबद्ध असल्यामुळे त्यांनाहि परमेश्वराचा मोक्ष मिळू शकत नाहीं. बद्ध असूनहि मुक्ततेची पात्रता असलेल्या जीवांनाच काय तो मोक्ष मिळू शकतो. आणि तोहि नित्यमुक्त परमेश्वराच्या ज्ञानाने किंवा प्रेमाने. नित्यबद्ध देवता ह्या जीवांना अनित्य फळे देऊ शकतात, पण आत्यंतिक मोक्ष मात्र देऊ शकत नाहीत. त्यामुळे जीवांनी शाश्वत आनंद प्राप्त करून देणारा मोक्ष मिळवण्यासाठी परमेश्वराचीच उपासना करणे अवश्य आहे, त्यासाठीं त्यांनी देवतांची उपासना करणे योग्य नाही, हा श्रीचक्रधरस्वामींच्या तत्त्वज्ञानाचा सारभूत अंश होय. या बैठकीवरून देवतांची उपासना त्यांनी त्याज्य ठरवलेली असल्यामुळे देवतांची उपासना प्रतिपादन करणारी शास्त्रे देखील परमेश्वरप्राप्तीच्या दृष्टीने त्यांच्या मते निरुपयोगी, त्याज्य व म्हणूनच अप्रमाण होत, हे सहजच सिद्ध होते.

श्रीचक्रधरस्वामींच्या मते, त्यांनी उपदेशिलेले ब्रह्मविद्याशास्त्र हेच काय ते मोक्षप्राप्तीची साधने उपदेशिणारे यथार्थ शास्त्र होय. इतर शास्त्रे ही निरनिराळ्या देवतांची प्राप्ती करून देणाऱ्या उपासनापंथांची प्रतिपादक म्हणून यथार्थ असली तरी आत्यंतिक मुक्तीचा व परमेश्वरप्राप्तीचा मार्ग उपदेशिण्याच्या दृष्टीने ती अयथार्थ, अर्थात् अप्रमाण होत. हे नीट लक्षात ठेवून श्रीचक्रधरस्वामींची वेदांबद्दलची भूमिका आता आपण पाहू.








# महानुभाव पंथाचें अवैदिकत्व

## वेद हे चैतन्यदेवतेचे साधन होय

एक वेळ महदाइसाने स्वामींना विचारले की भक्तांना सांगितलेले गीताशास्त्र हे आमचे शास्त्र आहे असे 'भगवे' म्हणजे वेदानुयायी संन्याशी म्हणतात ते का ? तेव्हा स्वामी म्हणाले 'सकळही शास्त्रे या शास्त्रासि मिळेति: परि हे कव्हणाही न मिळे' (विचार. १५१). म्हणजे इतर सगळ्या शास्त्रांचे सिद्धांत आपल्या ब्रह्मविद्याशास्त्राशी जुळतात, पण आपले ब्रह्मविद्याशास्त्राचे सिद्धांत मात्र इतरांच्या सिद्धांताशी जुळत नाहीत. गीता हे श्रीकृष्णोक्त खरेखुरे ब्रह्मविद्याशास्त्र आहे. वैदिकांचे सिद्धांत गीतेतील सिद्धांताशी जुळतात यांत आश्चर्य नाही (आणि म्हणूनच वैदिक गोसावी 'गीता हे आमचे शास्त्र आहे' म्हणून म्हणतात); पण गीतेतील सिद्धांत मात्र इतर कोणत्याच शास्त्राशी जुळत नाहीत, असा श्रीचक्रधरस्वामींच्या म्हणण्याचा आशय आहे. या वचनावरून एक गोष्ट स्पष्ट होते. ती ही की श्रीचक्रधरस्वामी वेदांना 'इतर' म्हणजे ब्रह्मविद्याशास्त्राविगळे शास्त्र मानतात. ते ब्रह्मविद्याशास्त्र नव्हे आणि म्हणून परमेश्वरप्राप्ति करून देणारे नाही, ही त्यांची भूमिका स्पष्ट आहे. या सूत्रावरील टीकेत 'स्थळ'कर्त्यांनी व 'बंद'करांनीहि हाच अर्थ उकलून दाखवलेला आढळतो. विचारस्थळकर्ते म्हणतात "सकळही शास्त्र म्हणजे कर्मरहाटीची जेतुलीहि दर्शने आगम **वेद** एवमादिक यां शास्त्रा म्हणजे ब्रह्मविद्येसि मिळती म्हणजे तेथिंचे सिद्धांत येथ मोडती : येणे करून तिये विषयो होति : हे कव्हणाही न मिळे म्हणजे येथींचिया सिद्धांताचा बूझ ते नेणीजे : हा तयात नाही : आचार विचार अवधेचि वैजात्य". या टीकेवरून 'वेद' हे कर्मराहाटीचे शास्त्र होय हे महानुभावांचे मत स्पष्ट दिसते आणि म्हणून ते अप्रमाण अतएव त्याज्य होय हे सिद्ध होते. 'बंद'कारांनी हीच गोष्ट स्पष्ट शब्दांत मांडली आहे. या सूत्रावरील भाष्याच्या आरंभी ते म्हणतात, "मा तरि इतर शास्त्र **वेदा**गमादिक ब्रह्मा तथा सनकादिकास श्रुत असती की ? ना तिये अपर अमोचके असती : म्हणौनि व्यात्रृत्ती आन ब्रह्मविद्या प्रतिष्ठा येणे वचने सांगितली." अर्थात् वेद हे 'परे' शास्त्र म्हणजे ईश्वरशास्त्र नव्हे, ते 'अपर' म्हणजेच ईश्वराच्या अलीकडचे, देवतासंबंधीचे शास्त्र आहे आणि म्हणूनच ते अमोचक आहे. त्याचमुळे त्या शास्त्राची व्यावृत्ति करून—त्याग करायला सांगून ब्रह्मविद्याशास्त्राची प्रतिष्ठापना या वचनांत श्रीचक्रधरस्वामींनी केलेली आहे. आपले हेच म्हणणे बंदकारांनी या सूत्राच्या भाष्यात पुढीलप्रमाणे अधिक स्पष्ट करून मांडलेले आहे. त्यांतील महत्त्वाचा भाग असा:— "सकळही शास्त्र म्हणजे कर्मराहाटीची म्हणजे देवतांची युगधर्मरूप क्रिया आचरणरूपाची... जेतुली दर्शने म्हणजे साही शास्त्रे ... **वेदांत** शास्त्र ... **वेद** म्हणजे ऋग्वेदादि ... व्यावृत्तिले असती" म्हणजे यांचा त्याग करायला सांगितले आहे. 'वेदे करूनि मायेचे अस्तित्व सांगितले' यावरून वेदांना मायेच्या अस्तित्वापर्यंतच जाणीव आहे. तिच्या पलीकडे असलेल्या परमेश्वराची तिला जाणीव नाही हे स्पष्ट होते.

## वेदांना चैतन्याच्या अस्तित्वाचीच जाणीव

श्रीचक्रधरस्वामींच्या दुसऱ्या एका वचनात हाच भावार्थ व्यक्त झालेला आहे. वेदाविषयी ते म्हणतात : 'कव्हणी एकु वेदविभागु : चैतन्याचिया अस्तित्वाते जाणे तथा बोले' (विचार.१४). यावर विचारस्थळकर्त्यांनी टिका केली आहे की 'कव्हणी एक म्हणीतल्या वेदीचे शेवटील प्रकरण : विभाग म्हणजे तया माजील उत्तरील अंश : अस्तित्व जाणे म्हणजे वस्तू एक आति इतुले ज्ञान : एवंविध संपूर्ण नाही.' याचा भावार्थ असा की, वेदांच्या एका विभागाला चैतन्याच्या अस्तित्वाचीच काय ती जाणीव आहे. पण त्याचे स्वरूप कसे आहे, काय आहे याविषयी संपूर्ण इत्थंभूत माहिती त्या वेदविभागाला नाही. चैतन्य हा शब्द श्रीचक्रधरांनी मायेसाठी वापरलेला आहे. 'चैतन्य : माया : विदेह : पराशक्ति' (विचार. १) ही मायेचीच निरनिराळी नावे होत (महानुभाव तत्त्वज्ञान, पा. ६९ ते ७३ पहा.). माया ऊर्फ चैतन्य ही परमेश्वर नव्हे; ती सर्व देवतांची स्वामिनी, म्हणजेच श्रेष्ठ 'देवता' आहे. अशा या चैतन्यदेवतेचीहि संपूर्णत्वाने वेदांना माहिती नाही. वेदांच्या कर्मकांडादि विभागाला तर ती नाहीच नाही. पण त्यांचा ज्ञानकां-








डॉचा जो भाग आहे त्यालाहि ती माहिती नाही. अर्थात्, वेदात जो काय ज्ञानात्मक विचार आलेला आहे तो ' माया ' या देवतेसंबंधीचा आहे. तदनुरूप आचरण केल्यास फार झाले तर चैतन्याची म्हणजे मायेची प्राप्ति होऊं शकेल, परमेश्वराची नाही. चैतन्य ही देवता असल्यामुळे तिचे फळ हे अनित्य आहे. अर्थात् ती देवता मोचक नव्हे. ' चैतन्यफल मोक्षतुल्य : परि तेथ च्युति हा दोषु' (विचार. १२) ' चैतन्यविद्या आदिकरौनि सकळही विद्या अपरा अमोचका बोलिजेति : चैतन्यापरु परमेश्वरु पाविजे तें अच्युत पद बोलिजे ' ( विचारमालिका. ८१ ) या वचनावरून ही गोष्ट स्पष्ट होईल. सारांश, वेदात ईश्वरविषयक ज्ञान नाही, म्हणून ती ब्रह्मविद्या नाही; त्यात चैतन्यदेवतेचाच काय तो उपासनामार्ग आहे. अर्थात् ते देवताशास्त्र आहे, म्हणजे कर्मराहाटीचे शास्त्र आहे. अच्युतपद प्राप्त करून देणार नाही. ( आणि म्हणून ते ईश्वरप्राप्तीचे साधन या दृष्टीने अप्रमाण आहे ) असे श्रीचक्रधरस्वामींचे स्पष्ट मत आहे.

## विचारबंदातील उल्लेख

हाच भावार्थ बंदकाराच्या अनेक सूत्रावरील भाष्यामधे व्यक्त झालेला आहे. त्यातील काही महत्त्वाचे भाग या ठिकाणी देतो. उदा० (१) 'कव्हणी एक वेदु विभागु '—( वि. १४ ) या उपरोक्त सूत्रावरील भाष्याच्या नंतर ' विचारबंद 'कार म्हण तो "...वेदादि प्रमाणी मायेचा प्रकाश होय... वेदादिसाधनी प्रकाशक : ऐसी पूर्वापर संसर्गपूर्वक स्वरूप : विद्या : साधन : साध्य व्यावृत्ती चवदा वचनी सांगितली असे... वेदादि प्रमाणी परमेश्वर नेणिजे तर तो कैसेनि जाणिजे पा : ना कृपावसे अवतरौनि परादि वाचा आंगीकरून आपणयाते प्रकाशी तै जाणिजे " आणि हाच महानुभावांच्या तत्त्वज्ञानाचा मुख्य सिद्धांत आहे. तो ' सूत्रपाठा 'च्या अगदी प्रारंभी असलेल्या ' पूर्वी ' नामक प्रकरणात " सृष्टीमध्ये कव्हणे करणे सूचिजेना एके परमेश्वरेवीण : तोचि परमेश्वरु निर्वेवो निराकारु असे : परि कृपावशे सावेवो साकारु होए : अवतरे : आपुले सन्निधान दे : ते दास्यमोचक" या शब्दांत आलेला आहे. ( २ ) ' ब्रह्मविद्येची सारखी वाटणी...' या ३६व्या सूत्रावरील भाष्याच्या प्रस्तावनेत विचारबंदकार म्हणतो—" तैसेचि वेदादि सकळ बहिर्याग : आन आगमकृत फळप्राप्तीसहित सांगितले तयाची व्यावृत्ती करून परमेश्वराची प्रतिष्ठा...अच्युतपदप्रशंसा. " यात वेदांना ' बहिर्याग ' म्हटले असून त्यांची व्यावृत्ति केली आहे. ' बहिर्याग ' म्हणजे युगधर्मव्यवस्थेनुरूप देवताप्राप्तीचे उपासनारूप साधन. या बहिर्यागांनी अथवा युगधर्मांनी परमेश्वर प्राप्त होत नाही. ' चहुयुगीचा धर्मी परमेश्वरु नेणीजे : न पाविजे :' ( सूत्रपाठ. युगधर्म. २८ ) असे श्रीचक्रधरांनी म्हटले आहे. वेद हा बहिर्याग म्हणजे देवताप्राप्तीचे साधन असल्यामुळे त्याचा त्याग केला पाहिजे हे स्पष्ट आहे. ( ३ ) आपण उपदेशिलेला पंथ ' प्रतीति पंथु की देमती ' ( वि. २७५ ) असे श्रीचक्रधरस्वामींनी म्हटले आहे. त्यावर विचारस्थळकर्त्यांनी लिहिले की ' हा प्रतीतीपंथ म्हणीतलेया सकळ मार्गाची व्यावृत्ति ' म्हणजे श्रीचक्रधरनिरूपित मार्ग सोडून इतर सगळ्या संप्रदायांचे निराकरण केले, त्यांचा त्याग सांगितला. हे इतर संप्रदाय कोणकोणते ? विचारबंदकार म्हणतो, '...सकळ मार्गाची व्यावृत्ति म्हणजे अंतर्याग : बहिर्याग : साधनोपसाधने : **वेदागम** : मंत्रतंत्रादि सकळ मार्गाची व्यावृत्ति म्हणजे अप्रतिष्ठा सांगीतली असे." यावरूनहि महानुभावीयांना वेदमार्ग किंवा वेदानुयायित्व त्याज्य आहे ही गोष्ट दिसून येईल. ( ४ ) सूत्र २५९वर भाष्य करतांना ' व्यवहारीची म्हणजे प्रवृत्तिधर्माची : सकळ सामग्री जाणणे म्हणजे **वेदाग**मादि सकळही ' असे विचारबंदकाराने म्हटले आहे, त्यावरून वेदमार्ग हा प्रवृत्तिमार्ग म्हणजे कर्मराहाटीचा देवतामार्ग आहे हे स्पष्ट होते. (५) वेद हा बहिर्याग हे 'लक्षण—बंदा'तलि उल्लेखावरूनहि दिसून येते. ' महावाक्य ' प्रकरणावरील आरंभीच्या भाष्यात बंदकार एके ठिकाणी लिहितात — 'तरी बाह्य म्हणजे बहिर्याग ... एवं शास्त्र आगम वेदादि यांते बाह्य बोलिजे : ते नव्हे : म्हणजे याचेनि जीवाचे अज्ञानमुंचन नव्हे '. ज्या वेदांमुळे जीवांचे अज्ञानहि नाहीसे होऊ शकत नाही असे महानुभाव मानतात ते त्यांना प्रमाण असणे कसे शक्य आहे ? आचारस्थळातहि वेदांची व्यावृत्ति अनेक ठिकाणी








सूचित केलेली आहे. त्यापैकी एक येथे देतो. (६) महानुभावपंथात अनुसरण करतांना ' कर्म : धर्म : विधिविखो परित्यजौनि परमेश्वरासी शरण रिगावे ' (आचार. ५६) असे श्रीचक्रधरस्वामींनी सांगितले आहे. यातलि ' कर्म ' या पदात कशाकशाचा अंतर्भाव होतो ? आचारस्थळात म्हटले आहे की '....**वेद**शास्त्र ज्योतिष वैद्यक मुख्य करूनि... ' अर्थात्, इतर गोष्टींबरोबर वेदांचाहि त्याग केला पाहिजे हे दिसून येते. (७) ' अन्यत्र आति ते ईश्वरी आति '—या सूत्रावर टीका करतांना ' अन्यत्र ' म्हणजे जीव—देवतांच्या ठिकाणी कोणकोणत्या गोष्टी आहेत हे सांगितले आहे. त्यात ' जीवाच्या ठायी जेतुलीया कळा गुण सामग्री... म्हणजे **वेदशास्त्राची** : आगम : अष्टादश पुराणांची : देवतांची साधने अंतर्याग बहिर्याग **उपनिषदादिक**' असा उल्लेख आलेला आहे. यावरूनहि वेद ही केवळ जीवाच्या ठिकाणी असलेली सामग्री आहे आणि ' उपनिषदे ' ही देवतांची साधने आहेत, अर्थात् ही दोन्ही मोक्षदायक नाहीत असे स्पष्ट म्हटलेले आहे. अशी पुष्कळ उदाहरणे या ठिकाणी नमूद करता येतील. पण दिली एवढी पुरे आहेत. यावरून वेद हे कर्मराहाटीचे देवताप्राप्तीचे साधन आहे. ते आत्यंतिक मोक्ष प्राप्त करून देणारे नाही. कर्मराहाटीच्या सगळ्या देवता व त्यांची साधने चक्रधरस्वामींनी त्याज्य म्हणून सांगितलेली असल्यामुळे वेद हेहि परमेश्वरप्राप्तीच्या दृष्टीने त्याज्य अर्थात् अप्रमाण होत हे दिसून येईल.

## बहिर्यागरूप वेद अप्रमाण

हीच वस्तुस्थिति आणखी निराळ्या रीतींनी व प्रमाणांनी सिद्ध करता येईल. जीवोद्धरणाच्या दृष्टीने परमेश्वरप्राप्तीचा खराखुरा मार्ग प्रतिपादन करणाऱ्या धर्मात (म्हणजे आपल्या पंथात) इतरांना आणणे व त्यांना भक्तीच्या मार्गाला लावणे ही श्रीचक्रधरस्वामींनी अत्यंत श्रेष्ठ क्रिया म्हणून सांगितलेली आहे. आपला मार्ग हाच खराखुरा ' परमार्ग ' होय असे त्यांचे म्हणणे होते. या परमार्गात जीवांना आणायचे म्हणजे त्यांना इतर धर्मांतून, अर्थात् ' अपर ' मार्गांतून काढले पाहिजे. ' परमार्ग 'सेवकांचे हे कार्य ' अपरधर्मापासौनि काढी : परधर्मी लावी ' या सूत्रात आलेले आहे. याचा भावार्थ, भक्त हा जीवांना इतर मार्गांतून म्हणजेच कर्मराहाटीच्या देवतामार्गांतून काढतो आणि त्यांना परमार्गात लावतो; म्हणजेच त्यांना आपल्या पंथात आणून मोक्षाच्या खऱ्या मार्गावर लावतो. यासाठी जीवांना कोणकोणत्या मार्गांतून काढणे अवश्य आहे ? विचारबंदकार लिहितात, " ... एवं उपदेशिला बहिर्याग : तथा देवतांचे तंत्रमंत्र : ब्रह्मवासना : कर्मवासना : **वेदा**गम : शब्दरूप बहिर्याग विढारन्याये साधनें ... तयापासौनि काढी...". याचा अर्थ असा की जीवाला आपल्या खऱ्याखुऱ्या मोक्षमार्गात किंवा परमार्गात आणायचे असेल तर त्याला त्याच्या वेदमार्गांतून काढले पाहिजे. तो जर वेदानुयायी असेल, वैदिक असेल तर त्याला त्याच्या वेदानुयायित्वाचा त्याग करायला सांगितले पाहिजे. तसे केल्यावाचून तो मोक्षमार्गाचा किंवा परमार्गाचा अधिकारी होऊच शकत नाही. ' विढारन्याये ' याचा अर्थच असा की, एकच साधक दोन निरनिराळ्या धर्ममार्गांचा अनुयायी असू शकत नाही. एका घरात ज्याप्रमाणे एकच बिऱ्हाड राहू शकते, आधी तेथे एखादे बिऱ्हाड राहत असले तर त्याच ठिकाणी आणखी दुसरे बिऱ्हाड राहू शकत नाही, (बाई : बिढारावरि काइ बिढारु असे : विचार. २६४) त्याप्रमाणे ज्याच्याजवळ आधीच एखादे साधन आहे त्याला दुसरे साधन देता येत नाही. या ठिकाणी याचा संबंध असा की जीवाजवळ जर आधीच चैतन्यदेवताप्राप्तीचे बहिर्यागरूप साधन जो वेद तो असेल, त्याचा जर तो अनुयायी असेल तर त्याला परमार्गाचे साधन जे ईश्वराचे ज्ञान (किंवा प्रेम) ते होऊ शकत नाही. ते होण्यासाठी त्याने पहिल्या साधनाचा, म्हणजे वेदानुयायित्वाचा त्याग केलाच पाहिजे. त्या जीवाला परमार्गात आणण्याची इच्छा करणाऱ्याने आधी त्याला वैदिकत्वाचा त्याग करायला सांगितले पाहिजे. याचाच अर्थ असा की इतर साधनाप्रमाणेच वैदिकत्वाचाहि त्याग केल्यावाचून जीव परमार्गात म्हणजेच महानुभाव पंथात येऊ शकत नाही. असे जर आहे तर मग महानुभाव ' वैदिक ' आहेत, ते वेदांना प्रमाण मानतात असे कसे म्हणता येईल ?








## वैदिक आचार्यांना नरक

श्रीचक्रधरस्वामी खडकुली येथे असतांना नृसिंहारण्यस्वामी नावाचे एक संन्यासी त्यांच्या दर्शनाला आले. भाषण करताना त्यांनी वेदांचा विषय काढला. ते म्हणाले, 'पूर्वी क्षपणकांनी वेदांचे उच्चाटन केले होते. पण शंकराचार्यांनी वादात त्यांचा पराभव करून अठरा क्षपणकांना कढईत घातले. त्या दिवसापासून वेदमार्ग पुन्हा सुरू झाला. वेदांची पुन्हा प्रतिष्ठापना करणारे शंकराचार्य असे पुण्यपावन आचार्य होत ' अशी ते शंकराचार्यांची स्तुति करू लागले तेव्हां श्रीचक्रधरस्वामी म्हणाले, 'आचार्या नरक ' (विचार. १५७). ही आख्यायिका या वचनाच्या प्रकरणवशात् आलेली आहे. शंकराचार्यांनी अवैदिक क्षपणकांना कढईत घातले हे ऐकूनच श्रीचक्रधरांनी 'आचार्या नरक' असे म्हटले. शंकराचार्यांनी क्षपणकांना कढईत घातल्याची हकीकत खरी की खोटी, कशीहि असो, तिच्या अनुषंगाने श्रीचक्रधरस्वामींनी उच्चारलेल्या वाक्याचा अर्थ आपणास पहावयाचा आहे. तो भावार्थ असा की, वैदिक अथवा वेदानुयायी आचार्यांना शेवटी नरक प्राप्त होणार ! वेदानुयायी आचार्यांनाच नव्हे तर देवताप्राप्तीची साधने निरूपणाऱ्या कर्मराहाटीच्या सगळ्याच आचार्यांना नरक प्राप्त होतात. कारण काय ? कारण ते जीवांची प्रतारणा करीत असतात म्हणून. 'आचार्या नरक : ते प्रतारक म्हणौनि' असे विचारस्थळातहि म्हटलेले आहे. इतर आचार्य जीवांची प्रतारणा करतात ती कशी ? उदाहरण म्हणून वैदिक आचार्यांचेच घेऊ. श्रीचक्रधरस्वामींच्या मते वेदोपनिषदे ही देवताप्राप्तीची साधने आहेत. अर्थात् ती कर्मराहाटीची शास्त्रे आहेत हे आपण पाहिलेच. वेद हा तर चैतन्याचा म्हणजे मायेचा बहिर्याग आहे. तदनुरूप आचरण केल्याने फार तर चैतन्यमायेचे फळ मिळू शकेल. पण पदरीचे पुण्य संपल्यानंतर जीवाला तेथून परत खाली यावे लागणार यात शंका नाही. (चैतन्यफल मोक्षतुल्य : परि तेथ च्युति हा दोषु : विचार. १२). असे असतांनाहि वैदिक आचार्य प्रतिपादन काय करतात ? की चैतन्य म्हणजेच परमेश्वर. वेदात सांगितलेल्या मार्गाचे जीवाने अनुसरण केले तर शेवटी त्याला अच्युत अशा परमेश्वराचे अक्षय्य पद मिळेल. इतर देवतांचे उपासक आचार्य देखील असेच सांगून जीवांची प्रतारणा करीत असतात. कर्मराहाटीचा प्रत्येक आचार्य आपल्या उपास्य देवतेलाच 'परमेश्वर' म्हणत असतो व तिच्या उपासनापंथात इतरांना लावीत असतो. हे खरोखर अन्यथाज्ञान आहे. चैतन्य अथवा माया ही देवता असतांना म्हणजेच परमेश्वराची ती एक शक्ति असतांना तीच परमेश्वर आहे असे प्रतिपादन करणे ही जीवांची प्रतारणा करणेच नव्हे काय ? अशा प्रतारक आचार्यांना नरक प्राप्त होतील हे काय सांगायला पाहिजे ? त्या आचार्यांनाच नाही तर त्यांच्या उपदेशाप्रमाणे आचार करणाऱ्यांनाहि शेवटी नरकच होणार. ' विचारखंड '-कर्ते म्हणतात : " आचार्या नरक म्हणजे जे कर्मराहाटीचे आचरते तयासि नरक : का : ना : ते प्रतारक म्हणौनि : तरि तेचि कैसे ना यथा भट्टाचार्या मद्यप्राशनेंसी ब्रह्महनन बोलिला : यथा जगळदेवे विंझदेवे निबंध काढिले : तथा कोळिका पंथ : नंद वोळीचे : शाक्तिचियें पंथिये : मग क्षेत्र धर्म शिकविते : कुविद्येचे : ऐसेया आचार्या नरक (१५७)". यातील भट्टाचार्य म्हणजे वैदिक आचार्य होय. इतरांबरोबर त्यालाहि नरक सांगितलेले असल्यामुळे वेदानुयायित्व श्रीचक्रधरस्वामींना मान्य नाही हे उघड दिसून येत नाही काय ?

## वैदिकांना महानुभाव पंथाचा अधिकार नाही.

वेद हा चैतन्य-मायेचा बहिर्याग असल्याचे आतापर्यंत अनेक वेळा उल्लेखिलेले आहे. या चैतन्यमायेच्या बहिर्यागालाच ' आत्मोपास्ति ' असे नाव आहे (महा. तत्त्वज्ञान. पा. ३०४ ते ३१६ पहा). कारण, आत्मोपास्तीचा संचार झाल्यानंतर अधिकारी जीवाला ' आत्म्या 'ची म्हणजे चैतन्यांश अथवा मायेचा अंश असलेल्या संज्ञाची उपासना करावी लागते. हा आत्मोपास्तीचा बहिर्याग ज्याच्या ठिकाणी आहे त्याला ब्रह्मविद्याशास्त्र प्राप्त होऊ शकत नाही हे आपण पाहिलेच. त्यालाच उपोद्बलक अशी आणखी एकदोन उदाहरणे देता येणे शक्य आहे. या आत्मोपास्तीचा अधिकार स्त्रियांना नसतो म्हणून विचारखंडकाराने नमूद करून ठेवलेले आहे. ' विचार ' प्रकरणातील ५१व्या वचनावर भाष्य








लिहितांना तो म्हणतो, " चौवर्णीचि युगधर्माचिया तथा आगमाचिया क्रिया आचराविया : तथा आत्मोपास्तिही पुरुषासीच संचरे : का जे स्त्रियासि अधिकार नाही. " वैदिकांच्या मते स्त्रियांना संन्यासाचा व मोक्षमार्गाचा अधिकार नाही हे आपणास ठाऊकच आहे. यावरून हा आत्मोपास्तीचा बहिर्याग आणि वेदमार्ग एकच असल्याचे दिसून येईल. वेदानुयायांना परमार्गाचा म्हणजे ब्रह्मविद्येचा अधिकार नाही हीच गोष्ट ' विचार ' प्रकरणातील १५०व्या वचनावर भाष्य करताना वेदकर्त्याने अधिक स्पष्ट केली आहे. ' देवतांचे फळिये : विद्यावंत : बहिर्यागिये यांसी ब्रह्मविद्ये अधिकारु नाही' असे विचारस्थळात म्हटलेले असून त्यातील 'बहिर्यागिये' पदाचे व्याख्यान करतांना टीकाकार म्हणतो, " बहिर्यागिये म्हणजे बोळीचे आगमिक : आन क्रिया आचरते जया जरठत्व बाणले ते आन आत्मोपास्तीचे यांसी ब्रह्मविद्ये अधिकारु नाही. " आत्मोपास्तीच्या बहिर्यागियाला म्हणजे वेदानुयायी उपासकाला ब्रह्मविद्येचे ज्ञान होऊ शकत नाही. अर्थात् त्याचा परमार्गात म्हणजेच महानुभाव पंथात प्रवेश होणे अशक्य होय. या गोष्टी स्पष्ट असताना महानुभाव पंथ वैदिक आहे, तो वेदानुयायी आहे असे म्हणता येणे कसे शक्य आहे ? आणि ते शक्य नसल्यामुळेच त्याला वेद प्रमाण आहेत असेहि म्हणता येणे शक्य नाही.

## एक चुकीचा युक्तिवाद

यावर असा एक युक्तिवाद होण्याचा संभव आहे की ईश्वरप्राप्तीच्या दृष्टीने श्रीचक्रधरस्वामींना म्हणजेच महानुभावांना वेदानुयायित्व मान्य नाही, तसेच ईश्वरज्ञानाच्या दृष्टीने त्यांना वेद प्रमाण नाहीत हे खरे, पण चैतन्याची ऊर्फ मायेची प्राप्ति करून देणारे म्हणून तरी वेद त्यांना प्रमाण आहेत की नाहीत ? म्हणजे वेदानुयायी वैदिक बनून तदनुसार आचरण केल्याने शेवटी चैतन्यमायेचे फळ मिळेल ही गोष्ट तर महानुभावांना मान्य आहे ना ? हे फळ मिळवून देणारा उपासना—पंथ निरूपणारे ग्रंथ ' वेद ' होत ही गोष्ट त्यांना प्रमाण आहे ना ? या प्रश्नाला ' होय ' असेच उत्तर दिले पाहिजे यात शंका नाही. पण त्यावरून महानुभावांना स्वतःला वेदानुयायित्व मान्य आहे किंवा ते वैदिक आहेत ही गोष्ट सिद्ध होऊ शकत नाही. जीवाचे ध्येय अविद्येपासून आत्यंतिक मोक्ष मिळवून ईश्वराचा आनंद उपभोगणे हे आहे. हा आत्यंतिक मोक्ष फक्त परमेश्वरच काय तो देऊ शकतो. त्याच्यापासून पूर्णपणे भिन्न असलेल्या देवतांच्या ठिकाणी ते सामर्थ्य नाही. असे असल्यामुळे ईश्वरप्राप्तीसाठी किंवा आत्यंतिक मुक्तीसाठी देवतांची उपासना करणे हा निखालस चुकीचा मार्ग आहे असे श्रीचक्रधरस्वामींचे स्पष्ट मत आहे. आणि म्हणून चैतन्यमायेचीच काय पण इतर कोणत्याहि देवतेची भक्ति करणे त्यांना मान्य नाही. ज्याला चैतन्याचीच प्राप्ति करून घ्यायची आहे त्याने वेदमार्गाने जावे ही गोष्ट अर्थातच त्यांना प्रमाण आहे; ज्याला भैरव देवतांची फळे मिळवायची आहेत त्याने आगम बहिर्याग आचरावेत, ज्यांना स्वर्गातील इंद्रचंद्रादिदेवतांचाच मोक्ष उपभोगायचा आहे त्यांनी तीर्थक्षेत्रव्रतदानांचा पुराणोक्त धर्म आचरावा हीहि गोष्ट त्यांना प्रमाण आहे. पण परमेश्वरप्राप्तीची साधने म्हणून किंवा परमेश्वरज्ञानाचे ग्रंथ म्हणून यापैकी कोणतीच गोष्ट त्यांना प्रमाण नाही. अर्थात् चैतन्यमायेची प्राप्ति करून देणारे ग्रंथ वेद होत ही गोष्ट महानुभावांना प्रमाण आहे. असे मान्य केले तरी त्यावरून महानुभावांचे वेदप्रामाण्य सिद्ध होऊ शकत नाही; आणि त्यांचे वेदानुयायित्व किंवा वैदिकत्व तर नाहीच नाही. तेव्हां वरील प्रकारचा युक्तिवाद करून महानुभावांचे वेदप्रामाण्य सिद्ध करणे चुकीचे होईल.

## वेद अप्रमाण; पण त्यांचा अनादर नाही.

ईश्वरप्राप्तीचे साधन म्हणून श्रीचक्रधरस्वामींना वेदानुयायित्व मान्य नाही आणि ईश्वरज्ञानाचे साधन म्हणून त्यांना वेद प्रमाण नाहीत, ही गोष्ट आता स्पष्ट झालेली आहे. अर्थात् श्रीचक्रधरस्वामी आणि त्यांनी स्थापन केलेला महानुभाव पंथ अवैदिक आहेत यात शंका नाही. तथापि, श्रीचक्रधरस्वामी ' वैदिक ' नसले तरी त्यांनी वेदांना विरोध केलेला आहे, त्यांचा अनादर किंवा उपहास केलेला आहे, असे मात्र नाही. देवता ह्या परमेश्वराहून भिन्न आहेत. त्या परमेश्वर नाहीत आणि म्हणून

आत्यंतिक मोक्षप्राप्तीसाठी त्यांची उपासना करण्यात अर्थ नाही. या दृष्टीने त्यांनी देवतांची व्यावृत्ति केलेली असली तरी देवता या परमेश्वराच्या शक्ती असल्यामुळे त्यांचा यथायोग्य आदर त्यांनी स्वतः ठेवला आणि आपल्या अनुयायांनाहि तो ठेवण्यास सांगितले. इतकेच नाही तर जेव्हां जेव्हां त्यांच्या अनुयायांनी देवतांचा उपहास केला तेव्हां तेव्हां त्यांनी तसे न करण्याबद्दल त्यांना आग्रहाने सांगितले. आपल्या प्रवासात ते बहुधा देवळात उतरत, तेथील देवतेच्या योग्यतेनुसार प्रसंगी तेथे विडा देखील अर्पण करीत. त्र्यंबकेश्वर येथील गंगाद्वाराजवळील कोळाई नामक देवतामूर्तीच्या बेंबीत त्यांचा डावळे नावाचा शिष्य बोटे घालून तोंडाने काही उच्चारीत होता. तेव्हां 'ऐसे न भणीजे की गा उखलेया : देवतेसि निरोधु होए' (आचार. २२९) या शब्दांनी त्यांनी त्याला 'सिक्षापण' केले; वगैरेवरून ही गोष्ट दिसून येईल. जी गोष्ट देवतांविषयी तीच त्यांच्या प्राप्तीच्या साधनांविषयी. श्रीचक्रपाणी राउळांनी अनेकांना 'विद्या' (अर्थात् देवतांच्या) दिल्या होत्या. त्यांचे विद्यावंत येत तेव्हां श्रीचक्रधरस्वामी त्यांचा आदर-सत्कार करीत. ते देवतासाधनवंत असल्यामुळे त्यांनी त्यांचा उपहास केलेला नाही. वेदांच्या बाबतीतहि हीच गोष्ट लागू आहे. चैतन्यमायेची प्राप्ति करून देणारे म्हणून वेदांचा अधिकार त्यांना मान्यच आहे हे वरील विवेचनावरून दिसून येईल. ज्यांना वेदाध्ययन करण्याचीच इच्छा असेल त्यांची ती इच्छा ते पूर्ण करीत. पदकर नागदेवभट हे त्यांच्या दर्शनाला येत. आपल्याला संध्येप्रमाणे वेद यावा अशी त्यांची फार इच्छा. एक वेळ ते बसले असतांना स्वामींनी म्हटले,' भटो एथ काही मागा.' तेव्हां त्यांनी काय मागितले ? " जी जी संहिताक्रमु यावा." श्रीचक्रधरस्वामींनी 'तथास्तु' म्हटले. त्यामुळें त्यांना (पदकर नागदेवांना) ते ज्ञान प्राप्त झाले. 'ते वेद म्हणतचि असाति : वेदु तो तेयासिचि निंगे' (ली. च. भाग २, पा. ४३) यावरून हे दिसून येईल.

## चैतन्यविद्यावंतांनी वेद निर्माण केले

पण याहीपेक्षा वेदाविषयीच्या महानुभावांच्या तात्त्विक भूमिकेवरुन ही गोष्ट अधिक स्पष्ट होईल. प्रावाहिक सृष्टीच्या आरंभी कृतयुग सुरू झाले. 'आत्मोपास्ति' हा कृतयुगाचा 'धर्म' असल्यामुळे त्या युगातील अधिकारियांच्या ठिकाणी या आत्मोपास्तीचा संचार करायचा कुणी ? कारण त्या वेळी चैतन्यदेवतेचा काय किंवा इतर कुणाचा काय विद्यावंत असणेच शक्य नव्हते. बरे, त्या देवतेच्या ज्ञानविग्रहाने ते कार्य करावे तर चैतन्यदेवता मुळी विग्रहच धारण करीत नाही. मग आत्मोपास्तीचा संचार करून सृष्टीचा क्रम चालू करायचा कोणी ? अर्थात् ईश्वराने ! " माया ते ईश्वरपैकी : तर ईश्वरपैकी का म्हणितली : ना : तिये विग्रह धरणे नाही तियेचा बहिर्याग अंतर्याग प्रथम ईश्वर अनार्जित देती' (विचारबंद. २०). 'चैतन्याविद्ये प्रथम ईश्वरदाता.' यावरून चैतन्यमायेची अंतर्याग व बहिर्याग ही साधने आरंभी ईश्वरानेच दिलेली आहेत. असे असताना परमेश्वरावताराकडून त्यांचा उपहास होणे कसे शक्य आहे ? वेद (मायेचा बहिर्याग) हा निर्माण केला कुणी ? मायेच्या विद्यावंताने. " कापुराचिये असती परीत मायेचा विद्यावंत वेद बोलिला ऐसे असे : तयात अभेदवादी आचरण जालेया आत्मोपास्तीचा अधिकार निपजे", " चैतन्यविद्यावंतापासौनिचि प्रथम वेद निर्माण होती." (विचारबंद. ३२) आणि आरंभीच्या चैतन्यविद्यावंताला हे सगळे सांगितले साक्षात् ईश्वराने ! तेव्हा त्याच्याच अवताराकडून त्या वेदांचा अनादर होणे शक्य नाही. तसेच, माया ही ईश्वरपैकीची असल्यामुळे, म्हणजे त्र्यंशात परमेश्वराने तिचा स्वीकार केलेला असल्यामुळे तिचा किंवा तिच्या साधनांचा, त्यांविषयी अमान्यता दाखवूनहि, उपहास श्रीचक्रधर–स्वामींकडून होणे शक्य नाही. श्रीचक्रधरस्वामींनी तसा उपहास केलेला नाही. उलट त्यांच्याविषयी योग्य तो आदरभावच त्यांनीं दाखविलेला आहे, हे वर दिलेल्या आख्यायिकेवरून दिसून येते.

## ब्रह्मवासनेचा वेदांती

हीच गोष्ट दुसऱ्याहि एका रीतीने दाखवून देता येईल. महानुभावांच्या 'क्रियापाका'नुसार या सृष्टीत परमेश्वरज्ञानाचा अधिकार येण्यासाठी जीवाकडून पूर्वसृष्टीत अहेतुक भूतभजन (म्हणजे जीव-देवता व काही ईश्वरावतार यांपैकी कुणाच्या तरी

ठिकाणी निर्हेतुकतेने भोजन ) घडले पाहिजे. असे अहेतुक भूतभजन ब्रह्मवासनेच्या जीवाकडून चांगल्या रीतीने होऊ शकते. म्हणून इतरांपेक्षा ( म्हणजे कर्मवासनेच्या वैदिकांपेक्षा ) ब्रह्मवासनेचा वैदिक जीव अधिक चांगला. 'कर्मवासनेपासि ब्रह्मवासना उत्तमू' (वि. १८०) असे श्रीचक्रधरस्वामींनी म्हटले आहे ते याच दृष्टीने. 'कर्म म्हणजे वेद: एवं वेदांचा सिद्धांत कर्मकांड : तत्प्रतिपादक वेद : तोचि ईश्वर मानिला : सद्भावाचा असद्भावो केला : तरि तोचि कैसा : ना सृष्टीमध्ये परमेश्वर नाही ऐसे मानीले : एवं कर्मचि तारक ऐसे बोले' हा कर्मवासनेचा मनुष्य. 'ब्रह्मवासनेचेनि ईश्वरी सद्भावो मानिला : तयाचा विकल्प निरसला', 'ब्रह्मवासना हा वेदांतिक'. हा ब्रह्मवासनेचा वेदांती श्रेष्ठ का ? तर 'ब्रह्मवासनेचा पुरुष सकळही क्रिया ते ब्रह्माचीचि इच्छा ऐसे मानी : ब्रह्मचि विस्तारले म्हणे : ब्रह्मासीचि सकळ क्रिया पावती ऐसे म्हणे : तया हेतु क्रिया केलेया ईश्वरब्रह्मी उपयोगा जाये : तेणे अहेतुकात पडे : तो ज्ञानासि कारण' (वि.बं., १६८). अर्थात, ब्रह्मवादी वेदांत्याला पुढील सृष्टीत ज्ञानाधिकार निपजतो, याअर्थी तो श्रेष्ठ असल्याचेच महानुभाव मानतात. त्याच्या ठिकाणी भोजन घालणारालाहि तो अधिकार येतो. तेव्हां 'सर्वं खल्विदं ब्रह्म' मानणारा वेदांती या सृष्टीत उद्धरला नाही तरी पुढील सृष्टीत त्याला परमेश्वराचे ज्ञान होऊन तो उद्धरणाच्या मार्गाला लागतो. म्हणून तो श्रेष्ठ मानलेला आहे. हा त्याच्याविषयी आदरभावच नव्हे काय ?

### वेदमार्गाचा उच्छेदक

या तात्त्विक भूमिकेवरून विचार केला तर श्रीचक्रधरस्वामींनी वेदांविषयी अनादर दाखवलेला नाही किंवा त्यांचा उपहासहि केला नाही, ही गोष्ट दिसून येते. तथापि वेदमार्गाचे अनुसरण जनतेने करू नये असे त्यांचे निश्चित मत होते यातहि शंका नाही. आपल्या या मताचा ते निर्भीडतेने आणि निर्भयतेने प्रचार करीत असत. त्यामुळेच अनेक वैदिक पंडित आपला वैदिक मार्ग सोडून श्रीचक्रधरस्वामींचे अनुयायी बनले होते. महदाश्रम हा त्या वेळच्या वैदिकांचा पुढारी होता. त्याच्या शिष्यांच्या प्रार्थनेवरून स्वामी त्याच्या आश्रमात गेले. तेव्हां तेथे काही संन्यासी वैदिक ग्रंथ वाचत होते. 'गोसावी पुसीले : हे काइ वाचिजताए : जी हे वेदांत : सर्वज्ञे म्हणीतले : वेदांती काइ प्रतिपाद्य : जी जी : आत्मा : तो कैसा :' त्यावर त्या संन्याशांनी आत्म्याचे प्रतिपादन केले. मग स्वामी म्हणाले, 'आत्मा तो काइ ऐसा : तो ऐसा की' असे म्हणून त्यांनी आपल्या मताने आत्म्याचे विवेचन केले. त्यात ते संन्याशी अतिशय रंगून गेले. या सगळ्या गोष्टींचा शेवटी परिणाम असा झाला की महदाश्रम हा श्रीचक्रधरांचा फार मोठा विरोधक बनला. 'आता हे आमचा मार्ग उच्छेदिती' असे त्याचे स्पष्ट मत बनले. म्हणून यंत्रासन तयार करून चक्रधरांचा खून करण्याचाहि त्याने प्रयत्न केला; पण तो साधला नाही. म्हणून पुढे हेमाडपंडिताचे साह्य घेऊन श्रीचक्रधरांचा नाश करण्याचा त्याने प्रयत्न केला. हा सगळा वृत्तांत मागे 'हेमाडपंताचा हृदयद्रावक खून' (महाराष्ट्रशारदा, जुलै १९३६) या लेखात मी दिलेला आहे. त्यावरूनहि चक्रधरांच्या नाशाचे जे प्रयत्न झाले, त्यांना त्यांचे 'अवैदिकत्व' हेहि एक कारण होते असे स्पष्ट दिसते.

---

"प्रेम आणि अभिमान यांत मी फरक करितों. अभिमान राखावयाचा असेलच तर भारतीय असल्याचा राखा; पण त्याचाहि दुरभिमान नको. आपण सर्व माणसें आहों हें विसरतां कामा नये."

—**विनोबा.** अजमेर, ९–५–४८. ('सेवक'मधून)








# मधाचें माहात्म्य

श्री. शंकर विनायक ठकार ( सहसंघटक, प्रांतिक ग्रामोद्योग–समिति पुणें ५. )

" बाई, येवढें औषध तुमच्या लेकराला मधांतून द्या, म्हणजे त्याला बरें वाटेल, " असें म्हणत आमच्या ग्रामफेरींतील वैद्यानें एक पुडी एका दुखणाईत मुलाच्या आईच्या हातीं दिली.

" पण दादा, आम्हां गरिबांच्या घरांत मध कोठून येणार ? "

" मग गुळांतून औषध दिलें तरी चालेल. "

" बरें, देईन. " असें म्हणत त्या बाईनें हातांतील पुडी एका बाजूस ठेवली व ती पूर्ववत् कपाळाला हात लावून बसली.

ग्रामीण जनतेचें औषधाबद्दलचें औदासिन्य ध्यानीं घेऊन आमच्याबरोबरचे एक चाणाक्ष मित्र आमच्या कानांत कुजबुजले—" औषध तुमच्या-देखत पोराच्या पोटांत जाऊं द्या, नाहीं तर तुमची पाठ फिरतांच ती पुडी तशीच पडून राहील. "

" बाई, ती पुडी द्या इकडे व आणा एक गुळाचा खडा; म्हणजे मीच औषध देतों " असा लकडा वैद्यराजांनीं लावला.

" दादा, तुम्ही जा, मी देईन औषध. " आपलें दारिद्र्य लपविण्याच्या हेतूनें ती मानी माउली परोपरीनें जसजशी सांगूं लागली तसतशी आमची शंका बळावलीच. आमच्या वैद्यराजांचा लकडा अधिक तीव्र होऊं लागला. शेवटीं,

" दादा, गुळाचा खडा बी न्हाय घरांत. " असे काकुळतीचे उद्गार आमच्या कानीं येतांच आम्हांस धक्काच बसला!

थोड्याफार अशाच कंगाल अवस्थेंत आपल्या देशांतील बहुसंख्य जनता नांदत असतांना मधाचें माहात्म्य कोणाकरतां सांगावयाचें असा दुःखद विचार मनांत आल्याशिवाय राहत नाहीं; पण अशा कंगाल अवस्थेंतून अंशतः बाहेर पडण्याचा एक मार्ग म्हणूनच हें माहात्म्य सांगणें अवश्य वाटतें. 'अधिक धान्य पिकवा' या मोहिमेंत (Grow more food Campaignमध्यें) समाविष्ट करतां येईल असा हा विषय आहे हें पुढील विवेचनावरून वाचकांच्या लक्ष्यांत येईलच. वस्तुस्थिति अशी आहे कीं सांप्रतच्या काळांत सर्वसामान्यपणें मध ही एक औषधी वस्तु समजली जाते व एकादी वस्तु अगदीं थोडी असली म्हणजे आपण ती 'औषधापुरती' आहे असें म्हणतों; त्याचप्रमाणें मध ही वस्तु अशी आहे कीं ती जर कोणाच्या घरीं असलीच तर ती अक्षरशः औषधापुरतीच असते. अर्थात् मध हें एक अन्न आहे ही गोष्ट आपण साफ विसरून गेलों आहों.

## ' अहिंसक मध '

वस्तुतः साखर किंवा गूळ जगांत अस्तित्वांत येण्यापूर्वीं गोडीसाठीं सर्व जग मधाकडेच धांव घेई; अर्थातच गोडीबरोबरच मधांतील औषधी गुण लक्षांत घेऊन हिंदुधर्मग्रंथांतच नव्हे तर कुराण व बायबल यांमध्येंहि मधाचा गौरवपूर्वक उल्लेख केलेला आढळतो. 'सर्वौषधिसमुत्पन्नं पीयूषसदृशं मधु' असें वचन जसें हिंदुधर्मग्रंथांतून आढळतें, तसेंच स्वर्ग म्हणजे दूध व मध यांचें आगर, मध हें देवाचें अन्न आहे, अशा आशयाचे उल्लेख खिस्ती बायबलमध्यें आढळतात. कुराणांत तर मधाबाबत एक स्वतंत्र प्रकरण आहे. पाली भाषेंत कुंभजातक नांवाच्या कथेंत दारू पिण्याचें व्यसन लागलेल्या राजाला दारू न पितां "मधाबरोबर पोळ्या खा" असा उपदेश केला आहे.







## मधाचें माहात्म्य

प्राचीन काळापासून मधाचें हें वैशिष्ट्य सर्व जगास माहीत होतें. तरी पण लोक मध कसा मिळवीत याचीं वर्णनें उपलब्ध नाहींत. सुश्रुतांची 'सुश्रुतसंहिता' व वाग्भटांचें 'अष्टांगहृदय' यांतून मधाचे औषधी गुणधर्म वर्णिले असले व त्यांवरून मध शुद्ध व अ-शुद्धहि असूं शकतो असें जरी स्पष्ट होत असलें तरी शुद्ध मध प्राचीन काळीं कसा मिळवीत याबाबतचें विवेचन कोठेंहि नाहीं. पण अर्वाचीन काळची मध-उत्पादनाची सर्वसामान्य पद्धति पाहिली म्हणजे मधाबद्दल किळस आल्याशिवाय राहत नाहीं. जंगलां-तील अडीअडचणींच्या ठिकाणीं व वृक्षांच्या ढोल्यांतून सुखानें नांदणाऱ्या व महाप्रयासानें मध गोळा करणाऱ्या मधमाश्यांना अग्नीनें होरपळून व धुरानें जर्जर करून त्यांचीं पोंवळीं हस्तगत करावयाचीं व मेलेल्या माश्या व त्यांचीं अंडीं यांच्यासह तीं पोंवळीं घाणेरड्या पद्धतीनें पिळून बाजारांत मध विकावयाचा हा कित्येक लोकांचा धंदा आहे. अशा ओंगळ रीतीनें आलेला मध रामबाण औषधाचें अनुपान म्हणून रोग्यास दिला जातो. हा सर्व किसळवाणा व दुःखद प्रकार पाहिला म्हणजे अशा मधाला मध तरी कां म्हणावयाचें हेंच कळेनासें होतें. औषधी वस्तु म्हणून अशा मधाचा उपयोग करणें रोग्याची शुश्रूषा करणाऱ्या सुजाण माणसाच्या जिवावर येतें; इतकेंच नव्हे तर त्यामुळें रोग्याच्या जिवावरहि बेततें असें म्हटल्यास त्यांत फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं. 'दृष्टीआड सृष्टि', 'गरजवंताला अक्कल नाहीं', अशा आपल्या लाचार, मतलबी व भोंगळसूत्री वृत्तीस अनुसरून या सर्व गोष्टी सर्रास चालू आहेत. पण भोगविलासी (materia-listic) म्हणून आपण ज्या पाश्चात्यांना हिणवतों त्यांना अशा वृत्तीचें वावडें आहे. जेथें दृष्टि म्हणजे चर्मचक्षू जाऊं शकत नाहींत तेथली सृष्टि पाहण्यासाठीं त्यांनीं सूक्ष्मदर्शक यंत्रांचा व 'क्ष' किरणांचा शोध लावला. व 'गरज ही संशो-धनाची जननी आहे '(Necessity is the mother of invention) असा पुरुषार्थद्योतक आदर्श त्यांनीं डोळ्यांपुढें ठेवून नाना प्रकारचे शोध लावले, हा त्यांचा गुण निःसंशय कौतुकास्पद आहे. इतर क्षेत्रांप्रमाणेंच मधमाश्या व मध या क्षेत्रांतहि त्यांनीं वाखाणण्या-सारखें संशोधन केलें असून याच कार्यास आपलें सर्व आयुष्य वाहिलेले संशोधक अद्यापहि पाश्चात्य देशांत आहेत. सांसारिक जीवन रडत कण्हत घाल-वावयाचें, पण आध्यात्मिक गोष्टींबद्दल मात्र अघळ-पघळ बोलावयाचें, अशा लोकांनीं 'जयां ऐहिक धड नाहीं। तयांचें परत्र पुससी कायी?॥' या ज्ञानेश्वरमहाराजांच्या उक्तीचें रहस्य ओळखलें पाहिजे. 'आमच्या वेदादि प्राचीन ग्रंथांतूनहि मधाचें माहात्म्य वर्णिलें आहे, रामायणांतहि 'पुष्पक' विमानाचा उल्लेख आहे, तेव्हां पाश्चात्यांचें कौतुक करण्याचें कारण नाहीं' असें मानणारे आत्मपर्याप्त (self-complacent) लोक कांहींच प्रगति करूं शकणार नाहींत. बहुधा अशाच लोकांना उद्देशून समर्थ रामदासांनीं 'सांगे वडिलांची कीर्ति, तो एक मूर्ख' असें म्हटलें असावें. 'थोडाही गुण मिळतां घ्यावा' अशी गुणग्राहकतेची वृत्ति व 'सर्वेऽत्र सुखिनः सन्तु' अशी व्यापक व सर्वोदयकारी वृत्ति धारण करणाऱ्या महात्मा गांधीजींनीं इतर अनेक बाबीं-प्रमाणेंच मधमाश्या व मध या विषयाकडे आपलें लक्ष वेधलें ही गोष्ट फार उपकारक होय असें कृतज्ञतेनें कबूल केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. मधमाश्यांचा नाश व त्यांची उपासमार न करतां मध उत्पादन करण्याच्या अर्थात् 'अहिंसक मध' उत्पादन करण्याच्या कार्याचा महात्माजींनीं आपल्या राष्ट्रसंवर्धक कार्यांत (Constructive programmeमध्यें) समावेश केला हें गांधींचें खूळ (fad) नसून त्यांनीं तीं एक फार बहुमोल कामगिरी बजावली आहे हें लक्ष्यांत घेणें जरूर आहे. भारतवासीयांचें लक्ष या जिव्हाळ्याच्या विषयाकडे खेंचण्याचें सर्व श्रेय महात्मा गांधींनाच आहे.

### पाश्चात्यांचें शास्त्रीय मधुमक्षिकापालन

मधमाश्यांच्या जीवनाचा शास्त्रीय दृष्ट्या अभ्यास करून पाश्चात्यांनीं मधुमक्षिकांचें पालन हा एक शास्त्रीय विषय बनविला आहे. रेव्हरंड एल्. एल्. लँगस्ट्रॉथ यांनीं १८५१ सालीं आधुनिक पद्धतीचें पहिलें कृत्रिम मधुमक्षिकागृह बनविलें. हिंदुस्थानसर-कारचें या विषयाकडे प्रथम लक्ष वेधणारा मि. जॉन डग्लस हा एक इंग्रज गृहस्थ असून तो तारखात्यांत होता. त्यानें फुरसतीच्या वेळचें हौसेचें काम (Hobby)

म्हणून या विषयाचा अभ्यास केला. त्यानें १८८१ सालीं हिंदुस्थानच्या स्टेट सेक्रेटरीशीं जो पत्रव्यवहार केला तो सरकारनें १८८३ सालीं प्रसिद्ध केलेल्या कागदपत्रांत समाविष्ट आहे. सांप्रत युरोप–अमेरिकेंत मधाचें उत्पादन इतक्या मोठ्या प्रमाणांत होत आहे कीं, मध हें एक अन्न इतकेंच नव्हे तर पौष्टिक अन्न होय हें जाणून दरसाल हजारों रत्तल मध ते खातात व परदेशांतहि पाठवितात. इंग्लंडमध्यें मधुमक्षिका–पालनसंस्था जिल्हानिहाय आहेत. अमेरिकेंत सॅन–ॲन्टोनियो येथें कित्येक वर्षांपूर्वी "मधुमक्षिका-पालकांची आंतरराष्ट्रीय कॉंग्रेस" भरली होती. तिकडे या विषयावरील लहानमोठ्या व शालोपयोगी ग्रंथांची संख्या तर विपुल आहेच, पण निव्वळ नियतकालिकेंहि १३० आहेत! हिंदुस्थानांत चार–दोन छोटीं पुस्तकें असतील व १९३९ सालीं सुरू झालेलें एकच नियतकालिक असून त्याचें नांव "इंडियन बी–जर्नल" असें आहे. तिकडील केवळ ग्रामीणच नव्हे तर कित्येक शहरी शाळांतूनहि या विषयाचें शिक्षण दिलें जातें. इंग्लंडमधील 'बोर्ड ऑफ एज्युकेशन' या संस्थेनें खास 'शिक्षकांसाठीं सूचनापुस्तक' प्रसिद्ध केलें आहे. विद्यार्थ्यांना मधमाश्यांच्या जीवनाचें निरीक्षण करतां यावें म्हणून कांचेचीं मधुमक्षिकागृहें बनविण्यांत आलेलीं असतात. मूलोद्योग ( Basic) म्हणजे जीवनशिक्षणपद्धती-नुसार हें शिक्षण शाळांतून दिलें गेल्यामुळें विद्यार्थ्यांच्या बालवयांत त्यांना जंतुशास्त्र, वनस्पतिशास्त्र, रसायनशास्त्र, लैंगिक शास्त्र, गणितशास्त्र इत्यादि विविध शास्त्रांचें शिक्षण एकसमयावच्छेदेंकरून समन्वयपद्धतीनें सहजासहजीं मिळूं शकतें असा तिकडील शिक्षणशास्त्रज्ञांचा अनुभव आहे. याच विषयाच्या बाबतींत नव्हे, तर इतर अनेक बाबतींतहि, पाश्चिमात्य देशांच्या मानानें आपला देश किती मागसलेला आहे याचा तुलनात्मक दृष्टीनें विचार केल्यास आपणांला लज्जेनें खालींच मान घालावी लागते. उदाहरणार्थ, कॅनडांत दर एकरीं ९७२ रत्तल गहूं पिकतो तर हिंदुस्थानांत ६३६ रत्तलच पिकतो! इटलींत एकरीं २९०३ रत्तल तांदूळ पिकतो तर येथें ७३१ रत्तलच पिकतो!! तिकडील जनता गोमांसभक्षक म्हणून आपण कितीहि हिणवीत असलों तरी तिकडील गाय सरासरी ३४१२ रत्तल दूध देते, तर गोमातेचें गुणगान गाणाऱ्या आपल्या देशांतील गाई सरासरी प्रत्येकीं ५२७ रत्तलच दूध देतात!!! इतर सर्व बाबतींत जो प्रकार आहे तोच मधाचे बाबतींत आहे हें सांगणें नकोच; तिकडील मधमाश्यांच्या वसाहती प्रत्येकीं जास्तींत जास्त २०० रत्तल मध देतात तर आमच्याकडे अद्याप २५ रत्तलांवर आंकडा गेलेला नाहीं! आपल्या देशांत मधोत्पादनाचे सुप्रसिद्ध टापू म्हणजे काश्मीर, मध्यहिंदुस्थान, महाबळेश्वर, नंदगड, होनावर, म्हैसूर, कुर्गप्रांत वगैरे होत.

## राणी–मधमाशीचें राज्य

मधमाश्या पाळण्याचा अभ्यास हा एक फारच बहारीचा, मनोरंजक व बोधप्रद विषय आहे. जसे मानवप्राण्यांचे पांच वंश असल्याचें शास्त्रज्ञ सांगतात, तसेच मधमाश्यांचेहि अनेक वंश आहेत. पण त्या तपशिलांत प्रस्तुत लेखांत जाण्याचें प्रयोजन नाहीं. तूर्त स्थूल मानानें इतकें समजलें म्हणजे पुरे कीं प्रत्येक वसाहतींत फक्त एकाच राणी–मधमाशीचें राज्य चालतें. तिला सवत सहन होत नाहीं. तिच्या शरीरांत फुलांतील अमृतांश ठेवण्याची सोयच नसते. तिचें काम फक्त अंडीं घालणें हेंच होय. रोज सुमारें तीन हजार अंडीं घालण्याची जबरदस्त शक्ति तिच्यामध्यें नसती व मधमाश्यांचा जो कामकरीवर्ग आहे त्याच्या दंशाची भीति जर जनतेला नसती तर मामुली पद्धतीनें मध मिळविण्याच्या राक्षसी प्रकाराचा परिणाम असा झाला असता कीं मधमाशी हा प्राणी अजीवात नामशेष झाला असता! अंडीं घालण्याची तिची शक्ति कायम असेपर्यंतच कामकरी माश्या तिला गोड गोड अन्न खाऊं घालून तिची सेवा करतात, पण ती शक्ति कमी होतांच तिला मारून टाकतात किंवा पिटाळून लावतात! नराचें काम फक्त एकदां प्रजोत्पादन करून स्वतः गतप्राण होणें इतकेंच असतें. मधोत्पादनाचें खरें काम फक्त कामकरी–वर्गच करीत असतो; व हें काम हा वर्ग इतक्या कसोशीनें व एकनिष्ठेनें करतो कीं सहा आठवड्यांत त्यांचे पंख जर्जर होऊन फाटून जातात व त्यांचें जीवित संपुष्टांत येतें. असें म्हणतात कीं










# मधाचें माहात्म्य

मधाच्या एका थेंबासाठीं त्यांना १२० फुलांजवळ जावें लागतें. त्या जास्तींत जास्त दोन मैलच जाऊं शकतात. फुलां-मोहोरांतील अमृतांश वेऊन येण्यास योग्य अशी त्यांच्या शरीराची ठेवण असते. हा अमृतांश त्यांच्या पोटांत गेल्यावर तेथें त्याच्यावर नैसर्गिक रासायनिक प्रक्रिया होऊन त्याचें मधांत रूपांतर होतें व मग तो मध पोंवळ्यांत सांठवला जातो. पोंवळ्यांत अंडीं ठेवण्याची जागा स्वतंत्र असते व मध ठेवण्याची जागा स्वतंत्र असते. ही त्यांची नैसर्गिक रचना पाहून तदनुसारच त्यांच्यासाठीं जीं लांकडी घरें तयार केलीं जातात त्यांचीहि रचना करण्यांत येते. निरनिराळ्या देशांत व ऋतूंत फुलां-मोहोरांचे वास व रंग जसे भिन्नभिन्न असतात व निरनिराळ्या वनस्पतींचे जसे भिन्नभिन्न औषधी गुणधर्म असतात, तसेच मधांचे रंग, वास व गुणधर्महि भिन्नभिन्न असतात.

## मधमाश्यांविषयीं कांहीं शास्त्रीय मौजा

मधमाश्यांच्या जीवनाविषयीं व स्वभाववैशिष्ट्यांविषयीं अनेक बोधप्रद व मनोरंजक गोष्टी सांगतां येण्याजोग्या आहेत; पण विस्तारभयास्तव त्या सर्व प्रस्तुत लेखांत सांगण्याचा मोह आंवरलाच पाहिजे. तथापि कांहीं ठळक गोष्टी त्रोटकपणें नमूद केल्याशिवाय राहवत नाहीं. येवढ्या माहितीवरून वाचकांची जिज्ञासा व निरीक्षणबुद्धि प्रदीप्त झाली तर या लेखाचा एक हेतु साधलासें होणार असल्यानें कांहीं गोष्टी येथें नमूद करतों:—(१) मधमाश्या पाळण्यासाठीं जीं लांकडी घरें करतात तीं घरें एका आकारांत जरी शेंपन्नास असलीं तरी प्रत्येक घरांतील म्हणजे वसाहतींतील मधमाश्या आपापलें घर नेमकें ओळखतात इतकेंच नव्हे, तर इतर वसाहतींतील एखादी माशी जर चुकून आपल्या वसाहतींत प्रवेश करूं लागली तर तिच्या वासावरून ती आपल्या वसाहतींतील नव्हे हें त्यांच्या तत्क्षणींच ध्यानांत येतें व प्रत्येक वसाहतींत पोलिसांचें काम करणाऱ्या ज्या माश्या असतात त्या तत्क्षणीं पुढें येऊन या नव्या माशीचा चांगला समाचार घेतात व त्या माशीला मारून तरी टाकतात किंवा पिटाळून तरी लावतात. (२) मधमाश्या आपल्या पोंवळ्यांत किंवा वसाहतींत कधींच मरत नाहींत; इतकेंच नव्हे तर, मलमूत्र-विसर्जनाहि करीत नाहींत! हे सर्व प्रकार त्या बाहेरच करतात. मधमाश्यांच्या जीवनाचें निरीक्षण करणाऱ्या एका तज्ज्ञानें असें सांगितलें कीं एकादा कीटक मध किंवा माश्या खाण्याच्या इराद्यानें जर वसाहतींत शिरला, तर त्याला मारून टाकण्यांत येतें, इतकेंच नव्हे तर, त्याच्या प्रेताच्या घाणीपासून उपद्रव होऊं नये म्हणून त्या प्रेताला चोहों बाजूंनीं मेण लपेटून त्याला जणूं हवाशून्य ( air-tight ) कबरींतच पुरून ठेवण्यांत येतें; मधमाश्या पाळण्याची ही जी शास्त्रीय व अहिंसक पद्धति आहे त्या पद्धतीमुळें मधमाश्यांचा किंवा त्यांच्या अंड्यांचा संहार तर होत नाहींच, पण त्यांची उपासमारहि होऊं नये अशी दक्षता घेतली जाते; मधमाश्या आपल्या गरजेपेक्षां अधिक मध गोळा करतात व तेवढाच घेतला जातो; फुलां-मोहोरांचा हंगाम संपला म्हणजे त्यांनीं सांठवून ठेवलेला मध काढून घेतला जात नाहीं. इतकेंच नव्हे तर, जरूर त्या प्रसंगीं त्यांना बाहेरून मध किंवा सरबत पुरवलें जातें. अमेरिकेंत असा प्रयोग करण्यांत आलेला आहे कीं चॉकोलेटच्या वासाचा मध जर हवा असेल तर त्या वासाचें द्रव्य त्यांना पुरविलें गेलें म्हणजे त्या वासाचा मध मिळतो; हें वृत्त 'Tit-bits' नामक नियतकालिकाच्या ता. ५ मार्च १९४८च्या अंकांत माझ्या वाचण्यांत आलें. (४) मधमाश्या पाळण्याचें काम कितीहि मनोरंजक असलें, हौसेचा व्यवसाय किंवा जोड-धंदा या दृष्टीनें तें कितीहि लाभदायी असलें तरीहि मधमाश्या दंश करतात व त्या माणसावर एकदम हल्ला करून त्याला सळो कीं पळो करून सोडतात ही भीति लोकांच्या मनांत इतकी रुजली आहे कीं हा उद्योग पत्करण्यास त्यांना हिंमत वा प्रवृत्ति होत नाहीं; पण वस्तुस्थिति अशी आहे कीं मधमाशी अंगावर बसल्यावर आपण घाबरून न जातां व ती झटकून टाकण्याची धडपड न करतां थोडी हिंमत राखून जर आपण स्वस्थ धीर धरून राहिलों तर ती उडून जाते; ती आपल्या बाहींत शिरली तरीहि धडपड न करतां हात वर केला म्हणजे, वरवर जाण्याची तिची स्वाभाविक प्रवृत्ति असल्यामुळें ती हात वर करतांच बाहींतून बाहेर निघून जाते. प्रत्येक वसाहतींतील माश्या आपल्या राणीशीं इतक्या राजनिष्ठ असतात कीं राणी








वसाहतीबाहेर उडून गेली तर क्षणांत तिच्याबरोबर सर्व माश्या उडून जाऊन वसाहत रिकामी होते. श्री. राजगोपालाचार्य ( स्वराज्यांतले आपले पहिले गव्हर्नर-जनरल ) यांच्या व खुद्द महात्मा गांधी यांच्या प्रेरणेनें कित्येक वर्षांपूर्वी या कार्यात प्रवेश करून प्रवीण झालेले श्री. एन्. विश्वनाथन् यांनीं आपल्या हनुवटीवर राणीला बसवतांच तिच्याभोंवतीं मधमाश्यांचा थवा जमून श्री. विश्वनाथन् यांना क्षणांत लांब दाढी दिसण्याइतक्या मधमाश्या तेथें जमल्या. हें दृश्य मीं अनेक वर्षांपूर्वी पाहिलें असलें तरी तें आजहि माझ्या मनश्चक्षूंसमोर उभें आहे! मधमाश्यांच्या दंशाची एकदां थोडीशी संवय झाली म्हणजे त्यांच्या दंशाचाहि इतका बाऊ वाटत नाहीं असें तज्ज्ञ सांगतात. ( ५ ) शिवाय या दंशाबाबत आणखी एक गोष्ट सांगितली तर वाचकांना आश्चर्यच वाटेल व पाश्चात्य शास्त्रज्ञांच्या संशोधक बुद्धीचें ते कौतुक करतील : मधमाशांच्या दंशामुळें रुधिराभिसरण वाढल्याचें पाहून संधिवात व अर्धांगवायु यांसारख्या म्हणजे Arthritis, Rheumatism व Paralysis यांसारख्या रोगांचा उपशम करण्यासाठीं Bee Venom Therapy नांवाच्या उपचारपद्धतीचें अवलंबन पाश्चात्य राष्ट्रांतील कित्येक डॉक्टर करीत आहेत!

## मध हें एक फार मधुर व हितकर अन्न आहे.

मधाचा उपयोग कोणकोणत्या रोगांवर व व्याधींवर होतो याची जंत्री येथें देऊन हा लेख लांबवणें इष्ट वाटत नाहीं. त्याबाबत येथें इतकें सांगितलें म्हणजे पुरे कीं आयुर्वेद-शास्त्रांत त्याचप्रमाणें पाश्चात्य वैद्यक-शास्त्रांतहि मधाचे अनेक उपयोग सांगितले आहेत. मधाचे व त्याबरोबरच मेणाचेहि बहुमोल गुण ओळखूनच इंग्लंड, अमेरिका, जर्मनी, रशिया यांसारखे संपन्न देशहि आपापल्या देशांत मधोत्पादनाच्या कार्याला खूप चालना देत आहेत हें प्रत्यक्ष पाहिल्यानंतर हिंदुस्थानसारख्या 'सुजला, सुफला, मलयज-शीतला' अशा, तरी पण कंगाल बनलेल्या आपल्या भूमींत या विषयाची जी उपेक्षा होत आहे ती पाहिली म्हणजे मन उद्विग्न होतें! मधोत्पादन या विषयाचा अंतर्भाव 'अधिक धान्य पिकवा' (Grow more food) या मोहिमेंत करावा असें म्हणणें कित्येकांस विचित्र वाटेल; पण या विषयाचें प्रत्यक्ष महत्त्व जाणणाऱ्या पाश्चात्यांचें उदाहरण डोळ्यांसमोर आणिल्यास त्यांचा भ्रमनिरास होईल. पहिल्या महायुद्धाच्या वेळचे इंग्लंडचे प्रधानमंत्री मि. डेव्हिड लॉईड जॉर्ज हे एक हौशी मधुमक्षिका-पालक होते. ते म्हणतात, "व्हिटॅमिन्सच्या अंगीं कितपत गुण आहेत हा शास्त्रज्ञांच्या मतें वादग्रस्त विषय असेल; पण मध ही तशी वस्तु नाहीं. लहान लेंकरांना व वृद्धांना मध हें द्रव्य सारखेंच जठराग्निदीपक, पौष्टिक, उत्साहदायी व जखम बरें करणारें आहे. देशाच्या अन्नोत्पादनाच्या कार्यांत मधुमक्षिकापालक महत्त्वाची सेवा बजावीत आहेत." दुसऱ्या महायुद्धापूर्वी मधुमक्षिकांच्या जास्तींत जास्त वसाहती चालविणारा देश रशिया हा होता. तेथें साठ लाख वसाहती होत्या; अमेरिकेंत पन्नास लाख होत्या. दुसऱ्या महायुद्धांत ब्रिटिश सरकारनें ब्रिटनमधील मधुमक्षिकाकेंद्रांनां खास सवलती दिलेल्या होत्या. अमेरिकेनें तर पन्नासपेक्षां अधिक वसाहती पाळणारांना सैन्यांत भरती न करण्याचें धोरण स्वीकारलें होतें; इतकेंच नव्हे तर सर्वच मधुमक्षिका-पालकांना आपापल्या मालाच्या व धंद्याच्या वाहतुकीसाठीं लागणारें पेट्रोल तद्वतच मोटार-टायर्स पुरविण्याबाबत अग्रस्थान दिलेलें होतें. यावरून युद्धासारख्या गंभीर प्रसंगीं सुद्धां अन्नोत्पादन व आरोग्यरक्षण या दृष्टींनीं पाश्चात्य देश किती लक्ष पुरवीत असतात हें उघड होत आहे. आंतरराष्ट्रीय परिस्थितीचें वास्तव ज्ञान असलेले आपल्या राष्ट्राचे प्रधान मंत्री पंडित जवाहरलाल नेहरू यांनींहि मधाच्या माहात्म्याबाबत काय म्हटलें आहे पाहा:—"मधमाश्यांचें पालन हा फार आकर्षक व्यवसाय आहे; इतकेंच नव्हे, तर तो अनेक दृष्टींनीं अत्यंत उपयुक्तहि आहे; मला तर मध आवडतोच, पण मला तो आवडतो कीं नाहीं हा प्रश्न बाजूस ठेवला तरीहि मध हें निर्विवादपणें एक फार सुंदर व हितकर अन्न आहे. ( आपल्या देशांतील ) बहुसंख्य लोकांनीं हा व्यवसाय करण्यास कांहींच अडचण नाहीं; कारण, मध हें पौष्टिक अन्न तर आहेच, पण हा व्यवसाय मनोरंजक असून शिवाय जोडधंदा होण्यासारखाहि आहे."

## मधाची पैदास पिकांफळांच्या पैदाशीला पोषक

इतकें सांगितल्यावरहि कित्येक वाचक म्हणतील कीं, "मधाची पैदास तरी किती व अन्न म्हणून ती पुरणार तरी किती लोकांना ?" मध हें अन्न आहे याचा अर्थ ती पोटभर खाण्याची वस्तु नसून तुपासारखी रोज चमचा दोन चमचे खाण्याची वस्तु आहे ही गोष्ट सांगावयास पाहिजे असें नाहीं. कानडी भाषेंत मध याला प्रतिशब्द 'जैनतुप्पु' असाच आहे. पण 'मधाचें उत्पादन तुपाइतकें तरी होईल काय ?' अशी शंका काढणारांस इतकेंच सांगतां येईल कीं मधोत्पादनाचा खास अभ्यास केलेले श्री. विश्वनाथन् यांनीं जी पंचवार्षिक योजना मुंबईइलाखा–ग्रामोद्योग–समितीपुढें मंजुरीसाठीं सादर केलेली आहे, त्या योजनेंत मुंबई–इलाख्यांतील दरसालच्या मधोत्पादनाचा अंदाजी आंकडा पांच वर्षाअखेर सुमारें बावीस लाख रत्तलांचा दिलेला आहे. तुपाच्या उत्पादनाच्या मानानें हा आंकडाहि कमीच आहे असें म्हणणारांना याबाबत आणखी एक मुद्द्याची गोष्ट निवेदन करणें जरूर आहे. मधोत्पादनाच्या कार्यामुळें प्रत्यक्ष मधाची उत्पत्ति जितकी होते, तिच्या किती तरी पट अधिक फायदा पिकांच्या व फळांच्या उत्पत्तीमुळें होतो, असें अमेरिकेंतल्या तज्ज्ञांनीं निरीक्षणांतीं नमूद करून ठेविलें आहे. याचा दाखला म्हणून स्ट्रॉबेरीजच्या पैदाशींतील वाढ शास्त्रज्ञांनीं जगापुढें मांडली आहे. मधुमक्षिकाकेंद्र स्थापन होण्यापूर्वी ज्या ठिकाणीं स्ट्रॉबेरीजची पैदास एकरीं ८४० रत्तल होती, ती तदनंतर १२५५ रत्तल झाली व शिवाय इतर पिकांना व फळांना फायदा झाला तो निराळाच. मधाची पैदास व पिकांफळांची पैदास यांचा अन्योन्य संबंध लक्ष्यांत येण्यासाठीं निसर्गांतील एका नित्याच्या व्यवहाराकडे दृष्टिक्षेप केला पाहिजे. फुलांमध्यें व मोहोरांमध्यें पुंकेसर व स्त्रीकेसर असतात व यांचें मीलन झाल्याखेरीज फल–निष्पत्ति होत नाहीं ही शास्त्रसिद्ध गोष्ट शाळांतील मुलांच्या पुस्तकांतून शिकविली जाते. हें मीलनाचें कार्य मधमाश्या फारच मोठ्या प्रमाणांत करीत असतात; म्हणूनच मधमाश्यांच्या सान्निध्यांतील पिकांची व फळांची पैदास एरव्हींच्यापेक्षां अधिक मोठ्या प्रमाणांत होत असते, ही निसर्गसिद्ध गोष्ट ध्यानीं घेऊन आपल्या देशांतील फुलांचे बगीचेवाले व फळबागवाले जर आपापल्या बगीच्यांत व मळ्यांत मधुमक्षिकांच्या वसाहती दाखल करतील तर त्यायोगें बरकत तर होईलच होईल, पण त्याबरोबरच जनतेस मधहि अधिक प्रमाणांत मिळण्यास मदत होईल.

## मधाचे जीवनोपयोगी गुणधर्म

वैद्यकीय व औषधिदृष्ट्या मधाबाबत एक महत्त्वाची गोष्ट नमूद करणें अत्यावश्यक आहे. गोडीच्या दृष्टीनें मधाची गूळ व साखर यांशीं जरी कांहींशी तुलना करतां आली तरी त्यांच्या औषधी व वैद्यकीय गुणधर्मांचा विचार केल्यास एका बाजूस मध व दुसऱ्या बाजूस गूळ व साखर यांच्यामध्यें जमीन–अस्मानाचा फरक आहे. मधाचें रासायनिक पृथक्करण करणाऱ्या अर्वाचीन शास्त्रज्ञांनीं गूळसाखरेंत नसलेलीं (Dextrose) डेक्स्ट्रोज व (Levulose) लेव्युलोज हीं द्रव्यें मधांत असल्याचें सिद्ध केलें आहे. या द्रव्यांचा बहुमोल गुणधर्म असा आहे कीं हीं द्रव्यें जिभेवर पडतांच तीं थेट रक्तांत भिनतात; गूळ–साखर पोटांत जाऊन पचल्यानंतरच त्यांचा शरीरास फायदा होतो. शिवाय आरोग्यास हितावह अशीं लोह, ताम्र, कॅल्शिअम, मॅंगेनीज वगैरे द्रव्येंहि मधांत असतात. या विशिष्ट गुणांमुळेंच आरोग्यदृष्ट्या गूळ व साखर यांपेक्षां मधच अधिक इष्ट होय हें सहज लक्ष्यांत येईल. अर्थातच टॉनिक म्हणून ग्लूकोज, डेक्स्ट्रोसॉल इत्यादि बाजारी औषधांपेक्षां, शुद्ध व अहिंसक मधच अधिक श्रेयस्कर होय यांत तिळमात्र शंका नाहीं. मधुमेहाचा विकार जडलेल्या रोग्यांनीं साखरेऐवजीं सॅकरिनसारखीं विदेशीय द्रव्यें वापरण्यापेक्षां मधाचाच वापर करणें उचित ठरेल.

मधाच्या या बहुमोल गुणामुळेंच, जन्मास आलेल्या बालकापासून तों आसन्नमरण अतिवृद्धापर्यंत व पचनशक्ति मंद झालेल्या तरुणापासून तों नानाविध रोगांनीं जर्जर झालेल्या रोग्यापर्यंत, सर्वांना मध विहित आहे. तसेंच जखमांनीं विव्हळ झालेल्या व अग्निदाहानें होरपळलेल्या जीवांना मधासारखें दुसरें शामक औषध नाहीं. बालक जन्माला येतांच सोन्याच्या अंगठीनें त्याच्या जिभेस मध लावण्याचा प्रघात










मद्रास प्रांतांत कित्येक ठिकाणीं आहे, तर तलवारीच्या टोंकास मध लावून तें अशा बालकांस चाटविण्याची प्रथा कित्येक रजपुतांत आहे. अन्नप्राशनाचा जो वैदिक संस्कार आहे त्यांत बालकाला बालावयाच्या अन्नाच्या पहिल्या घासांत मध घालण्याचा आदेश आहे. (दधि–मधु–घृत–मिश्रं अन्नं कांचने भाजने प्रक्षिप्य ततः प्रथम–कवलं प्राशयेत.) हातसूत कांतण्याचा चरखा नवविवाहित मुलीला देण्याची प्रथा जशी एके काळीं मारवाडांत व स्वीडन–नॉर्वे आदि देशांत रूढ होती, तशीच मधुमक्षिका–गृह देण्याची प्रथाहि कित्येक पाश्चात्य देशांत एके काळीं रूढ होती. यावरून मधाचें जीवनांत किती उच्च स्थान आहे हें ध्यानीं येईल.

## मधोत्पादनासंबंधीं पंचवार्षिक योजना

अशा या बहुमोल वस्तूचा प्रसार आपल्या देशांत करण्याचा जो अभिनंदनीय उपक्रम सांप्रत चालू आहे त्याला सर्वांनीं उत्थापन देणें अवश्य आहे. मुंबई–इलाखा–ग्रामोद्योग–समितीपुढें मधमाश्यांचे तज्ज्ञ श्री. एच. विश्वनाथन् यांनीं एक पंचवार्षिक योजना मंजुरीसाठीं मांडलेली आहे. या योजनेचें स्वरूप काय आहे व या कार्याबाबत जनतेकडून काय अपेक्षा आहेत हें आतां थोडक्यांत नमूद करीत आहेः—

या योजनेनुसार मुंबई इलाख्याच्या महाराष्ट्र, कर्नाटक व गुजराथ या तिन्ही विभागांतील अनुकूल प्रदेशांत मधुमक्षिका–पालनाचीं केन्द्रें उघडण्यांत येणार असून मोठ्या प्रमाणावर मधोत्पादनाचें कार्य व्हावयाचें आहे. मधुमक्षिकांच्या वसाहती स्थापन करण्यासाठीं अनुकूल असें क्षेत्र मुंबई इलाख्यांत एकन्दर सुमारें ५१८०० चौरस मैलांचें असून त्यांपैकीं महाराष्ट्रांत ४१००० चौरस मैल आहे. या टापूंत एकंदर २५० केन्द्रें काढावयाचीं असून वसाहतींची संख्या पांच वर्षांअखेर सव्वातीन लाख सुस्थिर होऊं शकेल. पांच वर्षांच्या अखेरीस दर–साल सुमारें २२ लाख रत्तल मध निर्माण होऊं शकेल असा अंदाज आहे. या कार्यासाठीं ६०० कार्यकर्ते लागणार असून असे लायक कार्यकर्ते तयार करण्यासाठीं शिक्षण–शिबिरें चालविलीं जाणार आहेत. या सर्व कार्यासाठीं अवश्य तें द्रव्य–साहाय्य मुंबई–सरकारकडून ग्रँटच्या रूपानें मिळविण्याची खटपट यथाकाल होईलच व जरूर ती ग्रँट सरकारकडून मिळेलच असा भरंवसा आहे.

वरील अंदाज केवळ कागदी नसून आजवर या कार्यांत प्रत्यक्ष जो अनुभव आला आहे व येत आहे त्याच्या आधारानेंच ही योजना आंखण्यांत आली आहे, ही गोष्ट महाराष्ट्रीय जनतेस पटवून देण्यास महाबळेश्वर–भागांतील गेल्या ३।४ महिन्यांतील कामाच्या प्रगतीचे आंकडे पुरेसे होतील.

ता. १९ मे १९४८ रोजीं मुम्बईचे गव्हर्नर ना. सर महाराजसिंह यांनीं महाबळेश्वर येथें मुंबई–इलाखा–ग्रामोद्योग–समितीच्या महाराष्ट्र–विभागाचे संचालक श्री. बापूसाहेब शेंडे यांच्या नेतृत्वाखालीं चालू असलेल्या ‘ मधमाश्या–संवर्धन–केन्द्रास ’ भेट दिली. त्या प्रसंगीं त्यांना सादर करण्यांत आलेल्या अहवालांत असें नमूद केलें आहे कीं, त्या भागांतील ३२ खेड्यांपाड्यांत १३४ मधमाश्यापालक असून त्यांच्या करवीं मधमाश्यांच्या ३५१ वसाहती संभाळल्या जात आहेत. या वसाहतींतून १५ मेपर्यंत ९७२ रत्तल ६० औंस मध निर्माण झाला. हें केन्द्र पाहून गव्हर्नरसाहेब व त्यांच्या पत्नी या दोघांनींहि संपूर्ण समाधान प्रकट केलें व स्वयंस्फूर्तीनें निवडक मधमाश्या–पालकांस बक्षिसें देण्यासाठीं रु. १००ची देणगी दिली. ता. २७ मे १९४८ रोजीं महाबळेश्वर येथें थाटांत झालेल्या बक्षीससमारंभास हजर राहण्याचें भाग्य मला लाभलें. मधमाश्यापालनांत शेतकरी वर्गांतील स्त्रिया व १२।१३ वर्षांचीं मुलेंहि असल्याचें पाहून व ऐकून सर्वांनाच अचंबा तसाच आनंद वाटला. त्या प्रसंगीं श्री. बापूसाहेब शेंडे यांनीं जेव्हां असें जाहीर केलें कीं, कित्येक शेतकऱ्यांनीं आपल्या फुरसतीच्या वेळेंत या हंगामांत मधमाश्या पाळण्याचें काम करून दोनशें रुपयांपर्यंतहि कमाई केली, तेव्हां तर सर्वच श्रोते आश्चर्यचकित झाले! बापूसाहेबांची अशी उमेद आहे कीं, पुढील सालच्या हंगामांत निदान ५००० रत्तल मध निश्चितपणें निर्माण होईल.

हें वृत्त वाचकांस निवेदन करण्यांत असा हेतु आहे कीं, ही संकल्पित पंचवार्षिक योजना मंजूर करण्याचा विचार ग्रामोद्योग–समिति व मुंबई–सरकार










करीत असतांना जनतेनेंहि याबाबतचें आपलें कर्तव्य पार पाडण्याच्या तजविजींत असावें. म्हणूनच या समितीच्या महाराष्ट्र–विभागाची महाराष्ट्रीय जनते-कडून काय अपेक्षा आहे तें शेवटीं नमूद करून हा लेख पुरा करावयाचें योजिलें आहे.

## महाराष्ट्रीय जनतेकडून अपेक्षा

(१) निसर्गांत, शेतीबाडींत व बागबगीच्यांत निर्माण होणाऱ्या फुलां--मोहोरांतून अमृतांश गोळा करून त्याचें मधांत रूपांतर करण्याचें जें कार्य मधमाश्या करीत असतात, त्या कार्याचा लाभ मधमाश्यांचा नाश न करतां व त्यांची उपासमार न करतां माणसांनीं घेण्याची जी शास्त्रीय पद्धति आहे तिचें शिक्षण घेण्यासाठीं उत्साही, महत्त्वाकांक्षी व हौशी कार्यकर्ते पुढें आले पाहिजेत. त्यांना शिष्यवृत्त्या देऊन शिक्षण देण्यासाठीं केंद्रें स्थापन करण्याचा समावेश पंचवार्षिक योजनेंत केलेला आहे.

(२) अशाच पद्धतीनें निर्माण होणारा 'अहिंसक' मध हाच खरा शुद्ध, शास्त्रीय व औषधी मध होय हें जाणून अशाच मधाचा आपल्या अनुपानांत आग्रहानें पुरस्कार करणारे वैद्य पुढें आले पाहिजेत.

( ३ ) पाश्चात्य देशांतील कित्येक शहरी व ग्रामीण शाळांतूनहि हा विषय शिकविला जातो ही गोष्ट ध्यानीं घेऊन व हा विषय शिकवितांना ओघानेंच वनस्पतिशास्त्र, जीवन–शास्त्र, रसायन–शास्त्र, आरोग्य–शास्त्र, आहार–शास्त्र, इत्यादि शास्त्रांचें बहुमोल ज्ञान विद्यार्थ्यांना लाभतें हीहि गोष्ट ध्यानीं घेऊन 'जीवन–शिक्षण' ( Basic education) देत असलेल्या शिक्षण–संस्थांनीं आपल्या अभ्यासक्रमांत हा विषय दाखल करण्याच्या दृष्टीनें विचार केला पाहिजे.

( ४ ) मधुमक्षिकापालन–केन्द्रें स्थापन केल्यामुळें प्रत्यक्ष मधाच्या व मेणाच्या पैदाशीमुळें जो लाभ होतो त्याच्या कितीतरीपट अधिक लाभ पिकांना व फळबागांना होतो ही गोष्ट शास्त्रीयदृष्ट्या सिद्ध झालेली असल्यानें बागायतदारांनीं व फळबागांच्या मालकांनीं आपापल्या क्षेत्रांत मधमाश्यांच्या वसाहती स्थापन करण्यासाठीं पुढें आलें पाहिजे.

( ५ ) शक्ति व तकवा येण्यासाठीं ग्लूकोज, डेक्स्ट्रोसॉल इत्यादि औषधें घेण्यास डॉक्टर सांगतात. हीं औषधें पोटांत जाऊन पचल्यानंतरच त्यांचा फायदा होतो; पण मध ही अशी अजब चीज आहे कीं, ती जिभेला लागतांच रक्तांत मिसळते. म्हणूनच ज्यांची पचनक्रिया बिघडलेली असेल अशा सर्वच रोग्यांना, जन्मास आलेल्या बालकापासून ते थेट वयातीत वृद्धापर्यंत सर्वांनाच मधामुळें अपरिमित फायदा होतो. शिवाय रोज दोन चमचे मध घेतला तरीहि पुरेसा असतो ही गोष्ट लक्षांत घेतल्यास बाजारी टॉनिकच्या बाटल्यांपेक्षांहि मध गरिबांस व मध्यमवर्गीयांनाहि परवडण्यासारखा असल्यानें अशा अहिंसक मधाचे ग्राहक वाढले पाहिजेत.

महात्माजींनीं आदेशिलेल्या कामांपैकीं हें काम तर सर्वतोपरी अक्षरशः गोड काम आहे. तेव्हां हें काम वरील मार्गांनीं अंमलांत आणण्याची स्फूर्ति वाचकांना होवो अशी प्रार्थना करून हा लेख पुरा करतों.

---

प्रेसिडेंट कूलिज यांनीं आपला मुलगा कॅल्व्हिन याच्याविषयीं एक गोष्ट सांगितली आहे. "मी ज्या दिवशीं प्रेसिडेंट झालों त्या दिवशीं कॅल्व्हिन् हा एका तंबाखूच्या शेतांत काम करीत होता. त्या वेळीं त्याला त्याचे कांहीं सोबती म्हणाले, 'आमचे वडील जर असे अध्यक्ष असते तर आम्हीं नसतें बुवा असें तंबाखूच्या शेतांत काम केलें !' त्यावर कॅल्व्हिननें उत्तर दिलें, 'अहो, तुमच्या वडिलांच्या जागीं जर माझे वडील असते, तर तुम्हांला तें करावेंच लागलें असतें !"








फक्त चीनच्या (तिबेटसहित) राज्याशीं संलग्न राहील, रशिया व अफगाणिस्तान यांशीं आपला कांहींच संबंध राहणार नाहीं. ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं रोजची कटकट टाळण्यासाठीं अशी युक्ति सरहद्दी ठरवितांना मुद्दाम योजिली होती कीं रशियाशीं आपली हद्द कोठेंच लागलेली असूं नये. असें घडण्यासाठीं त्यांनीं डुरान्द सरहद्द ठरवितांना वाखान नांवाचा सुमारें दीडशें मैल लांबीचा व वीस ते पन्नास मैल रुंदीचा एक चिंचोळा भाग रशिया व ब्रिटिश मुलूख यांच्यामध्यें मुद्दाम घातला. हा प्रदेश विख्यात पामीर पठाराच्या दक्षिणेस व अमू दर्या ऊर्फ ऑक्सस या नदीच्या लगत पसरलेला आहे. अमीर अबदुल रहिमान हा निर्जन, निरुपयोगी प्रदेश घेण्यास नाखुष होता म्हणून ब्रिटिशांनीं तो प्रदेश टेहेळणीखालीं ठेवण्यास लागणाऱ्या दीडशें—दोनशें फौजबंद पोलिसांच्या खर्चासाठीं त्याला जादा मदतीदाखल खंडणी देऊं केली, तेव्हांच तो ही ब्याद आपल्या गळ्यांत घेण्यास तयार झाला. ही चिंचोळी पट्टी मुद्दाम अशी जोडलेली आहे कीं अफगाणिस्तान व चिनी तुर्कस्तान यांचीं टोंकें जेथें मिळतात, तेथेंच ब्रिटिश टोंकहि मिळतें. म्हणजे हिंदुस्थानला रशियन तुर्कस्तानला जाण्यास दुसऱ्यांच्या प्रदेशांतून जावें लागतें. सध्यांच्या जम्मू—कश्मीर—राज्याचे बरोबर चार तुकडे पाडले तर उत्तर—वायव्येकडील चतुर्थांश हा अतिशय ओसाड, बर्फाच्छादित व उंचीवरचा प्रदेश असून त्याचीच हद्द अफगाणिस्तान व पाकिस्तान यांना आतां लागते. पण हा प्रदेश ओसाड म्हटला, तरी त्यांत गिलगितसारखीं कांहीं थोडीं सुपीक स्थानेंहि सखल प्रदेशांत वसलेलीं आहेत व कश्मीरांतून तुर्कस्तानकडे जाणारा रस्ता याच भागांतून जातो. एरव्हीं हिंदुस्थानला तुर्कस्तानांत जावयाचें असल्यास मसूरीच्या पश्चिमेस असलेल्या सिमल्यावरून जाणाऱ्या रस्त्यानें तिबेट तुडवीत लांबच्या वांकड्या वाटेनें गेलें पाहिजे. हिंदुस्थानचा आपणांखेरीज कोणाहि मुसलमानी राष्ट्रांशीं बिलकुल संबंध येऊं नये अशी इच्छा पाकिस्तानस्थापकांची असल्यामुळें, ते हा कोपरा आपल्या ताब्यांत राखण्यास साहजिकच झटणार. जर सरहद्द प्रांतांतील लोकमत काँग्रेसच्या बाजूस पडलें असतें तर कश्मीरचा प्रश्न उपस्थितच झाला नसता व हिंदुस्थानची सरहद्द आपोआपच अफगाणिस्तानशीं जोडली जाऊन पाकिस्तानची कोंडी झाली असती. अफगाणिस्तानचे संबंध पाकिस्तानशीं फारसे सलोख्याचे नाहींत, हें आतां स्पष्ट झालेंच आहे. जर वायव्येकडील सरहद्द—प्रांत अफगाणिस्तानास मिळाला— व तो वंशजातिदृष्ट्या कां मिळूं नये असाच प्रश्न विचारावा लागेल—तरच या दोन मुसलमानी राज्यांत कायम सलोखा नांदण्याचा संभव आहे हें आपण लक्षांत ठेवलें पाहिजे.

वंश—जाति—संस्कृती यांच्या दृष्टीनेंच महात्माजी कोठल्याहि प्रदेशाची फाळणी करूं नये असें म्हणत होते. काठेवाडांतून जुनागडला बाहेर पडतां येणार नाहीं असें ते याच मुद्द्यावर म्हणत. बंगालची व पंजाबची फाळणी हा या दृष्टीनें मोठाच अत्याचार आहे; पण पाकिस्तानच्या खोट्या तत्त्वाला आपल्या समजाविरुद्ध एकदां वाव दिल्यानंतर पंजाब—बंगालचे अत्याचार मुकाट सहन करणें ओघानेंच आलें. किंग्जले मार्टिनला उत्तर देतांना महात्माजींनीं पाकिस्तान व हिंदुस्थान यांतील भेद असा सांगितला कीं, पाकिस्तानची कल्पनाच मुळांत असलेल्या ऐक्याचे तुकडे पाडण्यावर झालेली आहे; पण हिंदुस्थानचें तें धोरण कधींच नव्हतें व म्हणून कश्मीरच्या फाळणीस मान्यता देतां येणार नाहीं. पण या प्रश्नाचा विचार करतांना गिलगितचें नांव निघालें तेव्हां महात्माजी बुजलेच! त्यांच्या मनांत गिलगित हा हिंदुस्थानचा भाग नाहीं व केवळ इंग्रजांनीं आपल्या राज्यास जोडल्यामुळें हा प्रदेश कश्मीरांत आला. वस्तुस्थिति अशी आहे कीं, महात्माजींचें ज्ञान विशेषतः इतिहासाबाबत अगदींच तोकडें होतें. इतिहासांत अनैतिहासिक मनाचा महात्माजींयेवढा ऐतिहासिक पुरुष क्वचितच झाला असेल. माणसांमाणसांतील सौहार्दावर महात्माजींची विचारसरणि बसविलेली होती. इतिहास—भूगोलांचें तिला प्रायः वावडें होतें. काठेवाड हा ज्या अर्थानें महात्माजी एकरूप मानीत, त्याच अर्थानें एकरूप सलग प्रांत कश्मीरचा करावयाचा तर त्यांत पश्चिमेकडील सबंध सरहद्द—प्रांताचा कोपरा तद्वतच त्यापलीकडील अफगाणिस्तानच्या राज्यांतील काफिरिस्तानहि ओढावें









लागेल. काश्मिरी भाषा आर्यभाषांच्या दरद कुलापैकीं आहे. या कुलांत बऱ्याच पोटभाषा सामावतात. काफिरिस्तानांतील बष्गाली, चित्राळ खोऱ्यांतील खोवार किंवा खोसवार, गिलगितभोंवतालच्या प्रदेशांतील शीना व सिंधु या नद्यांच्या दोन्ही बाजूंच्या प्रदेशांतील कोहिस्तानी ( डोंगरी )—या भाषा काश्मिरीच्या भगिनी होत. मात्र काश्मिरी ही एकच भाषा त्यांतून पुढें सरसावली व राजमान्यता पावली. कश्मीर शब्दाची व्युत्पत्ति कश्—खश् लोकांचा प्रदेश अशी आहे. ही जात महाभारत—कालांतहि नांव घेण्याजोगी होती. चित्राळचें स्थानिक भाषेंतील नांव कश्कार किंवा कश्गार असें आहे. त्याचाहि अर्थ खश् लोकांचें स्थान असाच आहे. नामसादृश्यावरून पाहिलें तर उत्तरेच्या चिनी तुर्कस्तानांतलि कश्गार यांचें नांव सुद्धां याच नांवावरून पडलेलें दिसतें. म्हणजे दोन हजार वर्षांपूर्वी पामीरभोंवतालचा मोठा प्रदेश एका काळीं या जातीनें व्यापलेला दिसतो. आतां या प्रदेशावर तुर्क, मोंगल, पठाण व चिनी या लोकांनीं आक्रमण करून ठिकठिकाणीं आपलीं घेटें निर्माण केलीं आहेत. पण जर कधीं काळीं कम्युनिस्टांच्या कल्पनेप्रमाणें एकवंशी आणि एकभाषी राष्ट्रें निर्माण करून जगाचा प्रश्न सोडवावयाचा असेल तर कश्मीरच्या उत्तरेकडील गिलगितच काय, पण त्याखेरीज वर सांगितलेला इतर प्रदेशहि त्यांत सामील करावा लागेल. मात्र अफगाणिस्तानांतील काफिरिस्तान या प्रदेशाला जोडावयाचें, तर दक्षिणेकडील पेशावर जिल्हा व इतर पुश्तु भाषा बोलणारा सरहद्दप्रांतांतील प्रदेश काबूलला जोडणें भाग पडेल. हा मोठा प्रश्न बाजूस ठेवून आतांच्या प्रश्नापुरतें पाहिलें, तरी कश्मीरच्या राजांनीं जिंकलेला राज्याचा उत्तरेकडील प्रदेश सोडण्याला आज सांस्कृतिक कारण कांहींच नाहीं हें निश्चित आहे. चित्राळचा मेहेतर—हा शब्द म्हातारा या मराठी शब्दाशीं एकरूप असून तत्सदृश मराठींतील प्रमुखदर्शक संज्ञा उत्तर कोंकणांतील म्हात्रे हें आडनांव आहे—हा गतवर्षापर्यंत कश्मीरचा नाममात्र कां होईना पण मांडलिक समजला जात असे. पण पाकिस्तानच्या निर्मितीनंतर मुस्लिम-लीगवाल्यांचें दडपण आल्यावर मात्र कश्मीरचें अधिराज्य सोडून तो पाकिस्तानांत सामील झाला. अशीच गोष्ट गिलगितजवळच्या हुंजा, नगर वगैरे संस्थानांच्या नायकांनींहि केली असून त्यांना बहुधा लीगवाल्यांची चिथावणी कारणीभूत आहे. अफगाणिस्ताननें सहा महिन्यांपूर्वी हिंदुस्थान—सरकारशीं याबाबत सूचनात्मक बोलणें काढलें होतें व हिंदी सरकारनें परवानगी दिली असती तर हा सर्व प्रदेश चुटकीसरशी अफगाणांनीं ताब्यांत घेतला असता. पण या गोष्टीमुळें संयुक्त-राष्ट्र-संघांत प्रश्न उपस्थित होईल अशी भीति बाळगणारें नेहरू—सरकार या मदतीच्या हाताचा स्वीकार करूं शकलें नसावें. दुसरें एक कारण असें कीं, ज्या मुद्द्यावर जुनागडचीं मंगरोळ आदि छोटीं मांडलिक संस्थानें हिंदी राज्यानें काठेवाडांत सामील करून घेतलीं, त्याच मुद्द्यावर त्याला चित्राळच्या मेहेतराचा पाकिस्तानस्वीकार कबूल करावा लागला असें दिसतें. कश्मीरच्या महाराजांनीं जर १४ ऑगस्ट १९४७पूर्वी मनाचा ठाम निश्चय करून पाकिस्तानांत सामील होणें पत्करलें असतें—व माजी प्रधान पं. रामचंद्र काक यांचा तसा प्रयत्न चाललाहि होता—तर नेहरूंनीं याबाबत चकारशब्द न काढतां मूग गिळले असते. पण पाकिस्तानवाल्यांना लोकांच्या बंडाळीच्या जोरावर हिंदु महाराजांहि उडवून लावावयाचा होता व हरिसिंग 'आपण उभय राज्यांच्याच काय, पण अफगाणिस्तान, रशिया, चीन व तिबेट यांच्या मध्यें असल्यामुळें निःपक्ष राहून आपलें स्वातंत्र्य राखूं शकूं ' असे मनचे मांडे खात होते ! त्यामुळें तशी घटना घडून आली नाहीं. आतां हिंदुस्थाननें कश्मीरांत हात घालून तेथील प्रजेला रानदांडग्यांपासून पुष्कळ खर्च करून वांचविल्यानंतर तो प्रदेश सोडणें कठिण वाटावें, हें साहजिकच आहे. फक्त कश्मीरच्या लोकांची इच्छाच पुढील भवितव्य ठरवूं शकेल.

## काश्मिरी संस्कृति ही हिंदु संस्कृतीला अधिक जवळची

वंशदृष्ट्या कश्मीरच्या प्रश्नाचें स्वरूप वर वर्णिलें. संस्कृतिदृष्ट्या कश्मीर—खोऱ्यांतील ९५ टक्के मुसलमान इतर कोठल्याहि मुसलमानांपेक्षां जास्त हिंदु संस्कृतीचे राहिले आहेत. असें होण्याचें मुख्य कारण








त्या प्रदेशाचा भौगोलिक स्वतंत्रपणा होय. मुद्दाम गेल्याखेरीज कश्मिरांत कोणी शिरूं शकत नाहीं. कश्मिरी भाषा इतर हिंदी भाषांहून येवढी वेगळी आहे कीं, ती अरबी लिपींत धड लिहितांहि येत नाहीं. शारदा किंवा नागरी लिपींत ती ठीक बसते. दुसरें कारण, कश्मिरी लोक एका मूर्तिभंजक मुसलमान राजानें एका दमांत मुसलमान बनविले असले तरी त्यांच्यावरील हिंदु संस्कृतीचे थर कधींच उखडून काढले गेले नाहींत. प्रत्येक कश्मिरी अजूनहि हिंदु ज्योतिषावर विश्वास ठेवून दैनंदिन व्यवहार करणारा राहिला आहे. त्यामुळें ब्राह्मणांची एक पोटजात केवळ जोश्यांचीच बनली आहे व या ब्राह्मणांवांचून कोणाचेंच चालत नाहीं. ९५ टक्के मुसलमान असलेल्या या प्रदेशांत ब्राह्मणांबद्दलचा आदर आजहि लोपलेला नाहीं. कश्मीरच्या राज्यांतील जम्मूचा दक्षिणेकडील प्रदेश भौगोलिक दृष्ट्या व भाषादृष्ट्याहि पंजाबचा भाग ठरेल. पण आतां पंजाबची फाळणी केल्यानंतर हा हिंदु वस्तीचा भाग पाकिस्तानांत जाण्यास कांहींच कारण नाहीं. तो पूर्व–पंजाबशींच जोडला पाहिजे. कश्मीरचें अखंड राज्य पाकिस्तानांत सामील होत नसेल तर निदान त्याची चिरफाड होऊन त्याचे तुकडे वेगवेगळ्या राज्यांत सामील व्हावे, अशी हिंदुस्थान दुर्बल करूं इच्छिणाऱ्या विघ्नसंतोषी इंग्रजांची इच्छा आहे. त्यामुळें शल्याची भूमिका घेतलेला एक लेखक पन्नास हजार बौद्ध लोकांच्या स्वयंनिर्णयाची कोणीच वास्तपुस्त करीत नाहीं असे नक्राश्रु ढाळतांना दिसतो ! हिमालयपारचे सर्व बौद्ध लोक एका तिबेटच्या राज्यांत सामील होत असले तर त्यांस कोणीच अडथळा करूं शकणार नाहीं. पण आज तशी स्थिति नसल्यामुळें, कश्मीरच्या राज्याचें निम्में क्षेत्रफळ या बौद्ध प्रदेशाचें असलें तरी, राजकीय व आर्थिक दृष्ट्या हा प्रदेश हिंदुस्थानशींच संलग्न राहणें जरूर आहे. कारण त्यांतून या प्रदेशांतील मोठे राजरस्ते जात आहेत व ते हिंदुस्थानाला चीन, रशिया, अफगाणिस्तान यांना जोडूं शकतात. खेरीज बौद्ध लोक हे हिंदु लोकांना जवळचे असल्यामुळें त्यांना पाकिस्तानांत ढकलणें अन्यायाचेंच होणार आहे. खेरीज हे लोक धर्मानें महायानी बौद्ध असले, तरी वंशानें बरेचसे दरद्–वंशीयहि आहेत. कश्मीर राज्याचा नैर्ऋत्य कोंपरा म्हणजे मुझफराबाद, पूंच जागीर व मीरपूर. यांत पठाण टोळीवाल्यांची आक्रमणानें वाढलेली बरीच संख्या आहे. पण तशीच ती अटक, रावळपिंडी, झेलम वगैरे जिल्ह्यांतूनहि आहे. जर कधीं काळीं पुश्तु बोलणारांचा प्रदेश सलग होणार असेल, तर हा प्रदेश कदाचित् लोकसंख्येच्या मतानें तिकडे ओढला जाईल. पण त्यांत अफगाणिस्तानांतील काबूलप्रभृति भागहि आला पाहिजे. आंतरराष्ट्रीय दृष्ट्या जोंपर्यंत अशी गोष्ट होऊं शकत नाहीं, तोंपर्यंत सध्यां हा प्रदेश कश्मीरशींच जोडलेला राहणें संरक्षणदृष्ट्या इष्ट आहे. आजकाल वर्तमानपत्रांतील तारांत येणारे राजौरी (=राजवडी) वगैरे भाग हे मूळचे अस्सल काश्मिरी आहेत. संस्कृत कवि बिल्हण हा या गांवचा रहिवासी होता व येथील मूळचे लोक काश्मिरीच आहेत. मात्र ते पठाणांच्या व पंजाब्यांच्या आक्रमणांनीं खालीं दडपले गेले आहेत. जर हिंदुधर्मीयांमध्यें मिशनऱ्यांची वृत्ति असती व त्यांनीं कालानुसार परत हिंदु करून घेण्याचें धोरण मध्यकालांत ठेवलें असतें तर बरेचसे काश्मिरी मुसलमान सहज हिंदू होऊं शकले असते. इतर मुसलमान काश्मिरी लोकांना धर्मलंड समजतात. आजहि त्यांच्यांत मक्केला जाण्याची प्रवृत्ति नाहीं. स्थानिक पीरांच्या भक्तीवरच त्यांचें भागतें व या पीरांचीं मूलस्थानें जुन्या हिंदु देवळांच्या जागांचीं बनलेलीं आहेत. म्हणजे काश्मिरी लोकांना त्या त्या जागेचें प्रेम आहे म्हणून ते त्या त्या पीराला भजतात. भुतेंखेतें व शकुनवंती यांवर त्यांचा नित्य आचारधर्म चालतो. सुमारें दोनशें वर्षांपूर्वीपर्यंत त्यांच्यांत आपल्या मुली हिंदूंना देण्याचा प्रघात चालू होता व आश्चर्य असें कीं हिंदूहि त्यांच्या बायका करून घेत. सुमारें शंभर वर्षांपूर्वी एकदां या गोष्टीला उघड मान्यता देण्यासाठीं काशीच्या पंडितांकडे हा प्रश्न गेला होता व त्यांनीं आपल्या हेकटपणानें त्याला संमति दिली नाहीं. त्यामुळें अनेक मुसलमान परत हिंदू होण्याचा मोका चुकला. मुसलमानी राजवटींतहि बाटलेले काश्मिरी पंडित मोठ्या हुद्द्यांवर चढत असत इतकी त्यांच्या हुषारीबद्दल राज्यकर्त्यांची








खात्री होती. आजच्या पाकिस्तानची तुतारी फुंकणारा महाकवि इक्बाल हा वंशानें काश्मिरी पंडितच होता व त्याचें घराणें शेंसवाशें वर्षांइतक्या अलीकडे मुसलमान झालें होतें. आपल्यांतील बौद्धिक व सांस्कृतिक ऱ्हास मुसलमानांनीं हिंदूंतलि उच्च माणसें बाटवूनच वेळोवेळीं थांबविला. उत्तर–हिंदुस्थानांतील उच्च मुसलमान ब्राह्मण व राजपूत यांच्याच रक्तांचे आहेत व ते आपापल्यांतच विवाह करीत राहिले आहेत. क्वचित् कारणपरत्वें त्यांच्यांत बाहेरचें रक्त मिसळलें असेल. जर हिंदूंत सारासार–विचार असता तर त्यांनीं या लोकांना केव्हांच सरमिसळ करून टाकलें असतें. ज्याप्रमाणें गोव्यांतील ख्रिस्ती सारस्वतांना आपण ब्राह्मण असल्याचा अभिमान आहे व ते बहुधा आपसांतच विवाह करतात, त्याप्रमाणेंच आजहि राजपुतांत मुसलमान राजपूत हे आपणांला जवळचे आहेत अशी भावना शिल्लक आहे व या भावनेमुळेंच अनेक मुसलमान घराणीं राजपुतान्यांत हिंदू राज्यांतील जागीरदार बनून राहिलीं आहेत. जयपूरचे माजी शिक्षणमंत्री जोबनेरचे ठाकूर नरेंद्रसिंघ आपल्या इंग्रजी प्रस्तावनेंत लिहितातः " राजपुतांतील हे दोन भाग दुधांत साखरेप्रमाणें एकत्र मिळून जाणार नाहींत काय ? कट्टर धर्मनिष्ठा व हट्टीपणाची वृत्ति दोघांतहि कायम असल्यामुळें त्यांनीं मूर्खपणानें आपसांत रक्तपात करून तरवारीनें या झगड्याचा निकाल लावूं पाहिलें. पण तो गेल्या हजार वर्षांत लागूं शकला नाहीं. दोन्हीहि भाग कायमच आहेत. ग्रंथकाराला अजूनहि अशी आशा वाटते कीं अखेरीस रक्त हें पाण्याहून घट्ट आहे ही म्हण सार्थ ठरेल व हिंदू आणि मुसलमान राजपूत आपलें रक्त एकत्र मिसळतील. तसें झाल्यास जगांतील कोठलीहि सत्ता त्यांना जिंकूं शकणार नाहीं."
—( जयपूरच्या तीस निर्णायक लढाया, १९३९, ग्रंथाची प्रस्तावना. )

राष्ट्रीयत्वाच्या ऐरणीवर घातलेला हिंदुसमाज अशाच वृत्तीनें हा प्रश्न भावी काळांत सोडवील अशी आशा आपण करूं या.

## धर्माचें स्वरूप भूगोलाशीं निगडित

इस्लामी धर्माच्या पहिल्या शतकांत एकदां अरब लोकांतील दोन पक्षांत भांडण झालें तेव्हां त्यांतील एका पक्षांतील बहादरानें पुढील उद्गार काढले होतेः " एकाद्या माणसासमोर ईश्वराचे दोन प्रेषित उभे ठाकले असतां त्यांतील कोणता गुरु करावा असा जेव्हां भ्रम पडतो, तेव्हां जो माणूस आपल्या देशाच्या व जातीच्या प्रेषितास अनुसरत नाहीं, त्याचा धिक्कार असो ! " हें वाक्य व त्यामागील विचारसरणि सर्वांनीं अनुसरावयाची तर महम्मदाचा धर्म हा अरब लोकांपुरताच म्हटला पाहिजे. धर्माचें स्वरूप आचारदृष्ट्या भूगोलाशीं निगडित असतें. ज्या जागेवर आपले शंभर पूर्वज नमस्कार घालीत आले ती जागा–अंधधर्म म्हणा पाहिजे तर–पवित्र वाटणें ही गोष्ट मनुष्यस्वभावास धरून नाहीं काय ? याउलट काल हिंदूचा मुसलमान होऊन आज अरबी संस्कृति व धर्म हींच प्रमाण मानणें या वृत्तीला काय नांव द्यावें ? सरहद्‌प्रांतांतील उत्तरेकडील खोऱ्यांत अजून बाह्यतः मुसलमान लोक राहत असतां आंत पुष्कळशी प्रतीकपूजा शिल्लक राहिली आहे. मुसलमान होऊनहि त्यांचें अजून काफिर हेंच नांव राहिलें आहे ! त्यांच्यातील राजे किंवा नायक आपणांस नबाब म्हणवीत नाहींत, तर मेहेतर व राजेच म्हणवितात. हा सर्व प्रदेश हिंदू संस्कृतीचा आहे–बौद्ध संस्कृतीहि यांतच येते–यांत संशय कसला ? अफगाण लोक संस्कृतोत्पन्न पुश्तु भाषा बोलतात आणि सांगतात कीं आम्ही वंशानें इस्रायली म्हणजे यहुदी वंशाचे आहों ! पेशावरचा म्यूझियम पाहिला तर या अभिमानाचा खोटेपणा दाखविण्यास वेगळा पुरावा नको. जर खरा स्थानिक म्हणजेच भौगोलिक म्हणजेच राष्ट्रीय अभिमान सत्यदृष्टीनें उत्पन्न होऊं शकेल, तर कश्मीरचा प्रश्न हिंदुस्थानला अनुकूल अशा तऱ्हेनेंच सुटेल. आज हिंदुस्थानला जोडणारा कश्मीरचा रस्ता ज्या पठाणकोट रेल्वे–स्टेशनापासून बांधला गेला आहे, त्याचें पठाणांशीं कांहींहि नातें नसून प्रतिष्ठानकोट असें त्याचें मूळ आहे, हें इतिहास अभ्यासिल्यानें लक्षांत येतें. तीच स्थिति बाहेरून मुसलमानी अवगुंठन घेतलेल्या पाकिस्तानांतील बहुसंख्य लोकांची आहे. काश्मिरांत कालपरवांपर्यंत तुर्की टोपी ठाऊकहि नव्हती; सर्वजण फेटे बांधीत. सर्वच पौर्वात्य पाश्चात्यांच्या आगमनापूर्वी असें करीत व टोपीवाला







किंवा टोपकर हें नांव त्यांना देत. अलीगडी संस्कृतीचा उद्भव व फैलाव होऊं लागल्यावर पौर्वात्य पागडी जाऊन तुर्की गोंडयाची टोपी किंवा केसाळ फर-कॅप प्रचारांत आली. असली फेझच आज काश्मिरी अबदुल्लांच्या डोक्यावर बसली आहे. त्या डोक्यांत खरा राष्ट्राभिमान संचरेल तर अजूनहि ती परकी टोपी उडून पागडी येण्यास अडचण येऊं नये असें वाटतें. नेहरू–अबदुल्लांचा प्रीतिसंगम अशी गोष्ट घडवील काय ?

---

## ' अमेरिकेचें खास तत्त्वज्ञान ! '

अमेरिकेंत मिडलवेस्टमधील एका विश्वविद्यालयांत एक तत्त्वज्ञानाचे प्रोफेसर होते. प्रोफेसरसाहेब स्वभावानें अत्यंत सज्जन आणि वृत्तीनें अत्यंत शालीन असे होते. त्यांनीं अत्यंत विचारपूर्वक असें आपलें एक स्वतःचें तत्त्वज्ञान ( system of philosophy ) बनविलें असून ती तत्त्वज्ञान–पद्धति ते आपल्या विद्यार्थ्यांना शिकवीत असत. कित्येक विद्यार्थ्यांच्या पिढ्या त्यांच्या हाताखालून शिकून गेल्या. विद्यार्थ्यांना त्यांचें तें तत्त्वज्ञान अतिशय आवडे. विद्यार्थ्यांच्या मध्येंच प्रोफेसरसाहेबांचा आणि त्यांच्या तत्त्वज्ञानाचा बोलबाला होई. त्यापलीकडे इतरांना त्यांच्याविषयीं फारसें कांहीं माहिती नसे. पण एकदां असें झालें कीं प्रोफेसरसाहेबांचा एक विद्यार्थी वृत्तपत्रव्यवसायांत शिरून एक अत्यंत यशस्वी असा पत्रपंडित बनला. त्याला कल्पना सुचली कीं प्रोफेसरसाहेबांची तत्त्वज्ञानपद्धति सर्व लोकांसमोर यावी. त्याप्रमाणें त्यानें प्रोफेसरांना आपली तत्त्वज्ञानपद्धति लिहून काढण्यास विनंति केली. प्रोफेसरांनीं मोठ्या नाखुषीनें पण आग्रहाला बळी पडून आपलें ' तत्त्वज्ञान ' लिहून दिलें. त्याची आगाऊच ' अमेरिकेचें स्वतःचें खास तत्त्वज्ञान ' अशी दणदणीत जाहिरात केली गेली. तें पुस्तक बाहेर पडल्यावर त्यावर ग्राहकांच्या इतक्या उड्या पडल्या कीं, त्यानें ग्रंथविक्रीचा उच्चांक गांठला ! ग्रंथाचे कर्ते जे प्रोफेसर त्यांनीं पण लोकप्रियतेचाही उच्चांक गांठला ! त्यांचा सर्वत्र 'उदो उदो' होऊं लागला. त्यांचीं छायाचित्रें सर्वत्र वर्तमानपत्रांतून झळकलीं. ठिकठिकाणीं नभोवाणी–केंद्रांतून त्यांचीं भाषणें ध्वनिक्षेपित झालीं. त्यांना निरनिराळ्या ठिकाणीं खाने, मेजवान्या दिल्या गेल्या. न्यूयॉर्कमधील श्रीमंत सुसंस्कृत स्त्रियांनीं–ज्यांना आधिभौतिक आणि आध्यात्मिक (Physics and Metaphysics) यांमधील फरक कळण्याचीही पात्रता नव्हती अशा स्त्रियांनीं—प्रोफेसरसाहेबांवर हुरळून जाऊन त्यांना आपल्या गोड लाडिक प्रश्नांनीं अगदीं भंडावून सोडलें !—एकदां प्रोफेसरसाहेब अशाच एका प्रचंड सार्वजनिक सत्कारसभेला जात होते. ज्यांच्या अध्यक्षतेखालीं त्यांचा सत्कार होणार होता, ते सद्गृहस्थ प्रोफेसरसाहेबांबरोबर होते. वाटेंत जात असतांना ते सद्गृहस्थ प्रोफेसरांना विचारतात—"कांहो आपला व्यासंगाचा विषय कोणता ? तत्त्वज्ञानच ना ?" यापलीकडेही दुसऱ्या एका प्रसंगी प्रोफेसरांच्या उपमर्दाची अगदीं कडी झाली ! एका ठिकाणीं त्यांना भोजनसमारंभाला बोलावलें होतें. भोजनोत्तर विविध मनोरंजक गोष्टीं ( after-dinner entertainments )चा जो कार्यक्रम छापला होता त्यांत आपले खेळ करून दाखविणाऱ्या जादूगाराबरोबर प्रोफेसरांचेंही नांव सोबत छापलें होतें ! प्रोफेसर तत्काळ घरीं गेले आणि त्यांनीं तेथून आपल्या गुणग्राहक विद्यार्थ्याला कळविलें,—" तुझी आणि त्याबरोबरच माझीहि अशी भोळी समजूत होती कीं निर्दोष तत्त्वज्ञानाचा जर सार्वत्रिक प्रसार झाला तर तें लोकांना पटून आपल्या देशाचा कायापालट होईल ! पण ही समजूत अगदीं चुकीची आहे. लोकांना तत्त्वज्ञानाचें शिक्षण द्यायची ही रीत नव्हेच नव्हे ! "

—Philosopher's Quest, by Irwin Edman मधून, [ हिंदु. २०–६–४८. ]








# भारतीय नवजीवनाची ऐतिहासिक पार्श्वभूमि

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

गुह्यं ब्रह्म तदिदं प्रब्रवीमि न मानुषात् श्रेष्ठतरं हि किंचित् ।—महाभारत, १२।२९९।२०.
" तुला रहस्य सांगतों कीं, मानव्यापेक्षां अधिक श्रेष्ठ कांहीं नाहीं. "

केवळ राजकीय क्रांति होऊन भारतीय समाज विकासाच्या मार्गावर जाणार नाहीं ही गोष्ट विचारी लोकांच्या लक्ष्यांत यावयास आतां मुळींच हरकत राहिली नाहीं. कारण तसें लक्ष्यांत यावयास आवश्यक तितका अनुभव आला आहे. भारतीयांच्या जीवनांतील दृष्टिकोणांत मूलतःच जर फरक झाला नाहीं तर हा अनुभव अधिक भयंकर व विनाशक स्वरूप धारण करील यांत मुळींच शंका नाहीं. म्हणून भारतीय समाजास सांस्कृतिक पुनर्जन्माची म्हणजे नवजीवनाची (renaissanceची) गरज आहे. कमींत कमी गेल्या हजार वर्षांचा भारतीय इतिहास असें सुचवितो कीं सर्व सामाजिक संस्था व संस्कृतीची रचना गेल्या हजार वर्षांत अनवस्था व विनाश यांच्या वारंवार पुनरावृत्ति करणाऱ्या चक्रांत सांपडल्या आहेत. उच्च जीवनाचीं सामर्थ्यें दर्शित करणारे प्रयत्न व उदात्त ध्येयवादाची स्फूर्ति यांचीं अनेक उदाहरणें हा इतिहास दाखवितोच. परंतु त्यांना कुंठित करणाऱ्या शक्ती त्यांच्यापेक्षां किती तरी पटींनीं अधिक प्रमाणांत समाजांत वसत आहेत, हेंहि तो हजार वर्षांचा इतिहास दाखवितो. याकरितां भारतीयांच्या सामाजिक जीवनांत सर्वांगीण बदल करणारा विचार उत्पन्न व्हावयास पाहिजे; परंपरागत सर्व सांस्कृतिक मूल्यांचें पुनः मूल्यमापन व्हावयास पाहिजे; त्यामुळेंच इतिहासाची दिशा बदलतां येईल. यासच नवजीवनाची चळवळ असें म्हणतात.

## नवजीवनाच्या चळवळीची प्रेरक शक्ति

सर्व मूल्यांचें उगमस्थान व सर्वांत वरिष्ठ मूल्य मनुष्य आहे, अशी प्रतीति ही नवजीवनाच्या चळवळीची प्रेरक शक्ति होय. संस्कृतीला इतिहासांत जेव्हां जेव्हां उत्तम बहर येतो, तेव्हां तेव्हां मनुष्य अंतर्मुख होऊन आत्मसंशोधन करावयास लागतो; तेव्हांच स्वर्ग व नरक, बंध व मोक्ष, वैभव व दैन्य, यांचें केंद्र त्याला आत्म्यांत सांपडतें. तो आत्मनिरीक्षण करावयास लागतो तेव्हांच त्यास स्वतःचे ठिकाणीं आणि आपण निर्माण केलेल्या सांस्कृतिक जगाचे ठिकाणीं असलेले दोष, अपूर्णता आणि आत्मनिर्मित बंधनें यांचा शोध लागतो, तेव्हांच परंपरेनें श्रद्धा ठेवलेल्या तत्त्वांमधील मर्यादा व आभास उघडकीस येतात. त्यामुळेंच (१) सत्यसंशोधनाची प्रेरणा निर्माण होते, चिकित्सक प्रवृत्तीला उत्साह येतो व बुद्धिवाद जन्मतो; रूढींनें मानलेल्या व पवित्र समजलेल्या सामाजिक संस्थांचा संकुचितपणा, मिथ्याभिमान तसाच अमानुषपणा निदर्शनास येतो; त्यामुळें विवेकबुद्धि त्यांच्या विरुद्ध बंड करून उठाव करते आणि (२) मानवाच्या श्रेष्ठतेचा व व्यापकतेचा प्रत्यय उदात्ततर नैतिक ध्येयांची निर्मिति करून नव्या सामाजिक आणि राजकीय संस्थांना जन्माला घालतो. कलेच्या क्षेत्रांतहि या स्थित्यंतराचें प्रत्यंतर तितक्याच उत्कटत्वानें येऊं लागतें. (३) वाङ्मयांत, चित्रकलेंत व स्थापत्यांत भावनांतील संग्रामाच्या व आदर्शांच्या उच्चतर उन्मेषांनीं युक्त अशी प्रतिभा अवतरते.

## युरोपच्या इतिहासांतील ग्रीक व मध्ययुगीन नवजीवनाच्या चळवळी

युरोपच्या इतिहासांत या नवजीवनाच्या चळवळीची अनेक वेळां आवृत्ति झालेली दिसते. हिंदुस्थानांत-

# भारतीय नवजीवनाची ऐतिहासिक पार्श्वभूमि

हि ही नवजीवनाची चळवळ पूर्ण पराकाष्ठेस पोंचल्याची एक प्राचीन घटना इतिहासाच्या विमर्शकांच्या लक्षांत येते. युरोपच्या इतिहासांतील या घटनांचा त्यांच्या फलितासह संक्षिप्त निर्देश करून हिंदुस्थानांतील त्या अति–प्राचीन घटनेचा अर्थ येथें सांगावयाचा आहे. हिंदुस्थानांतील ही प्राचीन घटना ज्या वेळीं घडली त्याच वेळीं युरोपांतहि तशीच घटना घडत होती. मानवाची अंतर्मुखता हेंच मुख्य लक्षण त्या दोन्ही घटनांचे ठायीं आढळतें. ग्रीस देशांतील सॉक्रेटिसाची संस्कृति आणि हिंदुस्थानांतील बुद्धावतारकालीन संस्कृति यांच्यांत हें साम्य पूर्णपणें प्रतिबिंबित झालेलें दिसतें.

सॉक्रेटिसापूर्वी ग्रीक तत्त्ववेत्ते विश्वमननांत गढलेले होते. सॉक्रेटिसाच्या काळापासून मनुष्याच्या जीवनाचें रहस्य हा तत्त्ववेत्त्यांच्या विचारांचा मुख्य विषय बनला. विश्व–विषयक तत्त्वज्ञान हा जीवनाच्या तत्त्वज्ञानाचा भाग बनला. जीवनदर्शन संस्कृतीचा आदर्श बनलें. सॉक्रेटिस्, प्लेटो व ॲरिस्टॉटल यांना 'नैतिक तत्त्वांची उपपत्ति सर्व उपपत्तींचा प्राण होय,' असें दिसलें. ख्रिस्ताच्या संदेशाची बैठक यांनीं रचली. ख्रिस्ताच्या धार्मिक उपदेशाचें तत्त्वदर्शन ख्रिस्ताच्या पूर्वी कित्येक शतकें भूमध्यसमुद्राच्या किनाऱ्यावर जन्मलें, वाढीस लागलें व प्रौढ बनलें. सॉक्रेटिस, प्लेटो व ॲरिस्टॉटल यांनीं ग्रीस देशाच्या संस्कृतीला अमर करणारा विचार तयार केला व नैतिक, सामाजिक व राजकीय आदर्श निर्माण केले. परंतु भौतिक वैभवाच्या व साम्राज्याच्या लालसेनें ग्रीक संस्कृतीला अमर नवजन्माचा लाभ होण्याच्या अगोदरच दग्ध केलें. तो विचार मात्र अमर राहिला. तो प्रथम अलेक्झांड्रियाच्या मठांत निर्वासित झाला, तेथून दीर्घकालानंतर महंमदाच्या थोर अनुयायांच्या विशाल साम्राज्याकडे आश्रयार्थ गेला आणि शेवटीं पुनः युरोपांत त्यानें स्थलांतर केलें. युरोपांत आल्यावर मध्ययुगीन धार्मिक स्वप्नांत झोंपलेल्या युरोपाला त्यानें जागृत केलें. आधुनिक पाश्चात्य संस्कृतीची प्राण–प्रतिष्ठा त्यानें केली. त्यामुळें बुद्धिवाद, भौतिक विज्ञान, ऐहिक जीवनाची महती, मानव्यकेंद्रित काव्य व कला, पुरोहित–वर्चस्वापासून मुक्त राज्यसंस्था इत्यादि आधुनिक पाश्चात्य संस्कृतीची पूर्वतयारी करणाऱ्या प्रवृत्ती तेराव्या–चौदाव्या शतकाच्या सुमारास युरोपांत उत्पन्न झाल्या. रॉजर बेकन् यानें भौतिक विज्ञानाचा पाया घातला, नवें तर्कशास्त्र रचण्यास सुरुवात केली. लिओनार्दो द विंचि हा एक अत्यंत सुंदर परिणत–प्रज्ञ, व प्रतिभाशाली इटालियन चित्रकार होता. याच्या प्रज्ञेचा प्रवेश झाला नाहीं असें कोणतेंच विद्येचें वा कलेचें क्षेत्र राहिलें नव्हतें. त्यानें विज्ञान आणि यंत्रविद्या यांच्यासंबंधीं अघटित वाटणारे प्रयोग केले. डांटे या महाकवीनें आपल्या काव्यांत 'दिव्य व मानव्य एकरूपच होत' हें इंगित सांगितलें. मायकेल् अंजेलो या मूर्तिकारानें धार्मिक व स्वर्गीय अशा स्थापत्यांत, मूर्तींत व चित्रणांत मानवी जीवनाचें रहस्य भरून टाकलें. या नवजीवनाच्या चळवळींनीं पवित्र रोमन साम्राज्य विदीर्ण करून स्वतंत्र धार्मिक वर्चस्वापासून मुक्त अशीं राज्यें व राष्ट्रें युरोपांत उदयास आणलीं. फ्रेंच ज्ञानकोशकारांनीं बुद्धिवाद व तत्त्वज्ञानांतील भौतिकवाद यांची प्रतिष्ठा वाढविली. लोकसत्तेच्या चळवळीला भर आला. भौतिक जीवनाला महत्त्व देणारी पाश्चात्य संस्कृति भरभराटीस येऊं लागली. विज्ञान विरुद्ध धर्मसंस्था यांचा झगडा होऊन व त्यांची फारकत होऊन विज्ञानाचें श्रेष्ठत्व मान्य झालें. परंतु त्याबरोबर शाश्वत नैतिक मूल्यांचा आधार असलेली धर्मसंस्था निर्बल झाली.

या तेराव्या व चौदाव्या शतकांत निर्माण झालेल्या नवजीवनाच्या चळवळीचें फळ असलेली पाश्चात्य संस्कृति आतां अपरंपार विनाशाच्या दाढेंत सांपडली आहे. नैतिक अगतिकता हें या विनाशाच्या परिस्थितीचें मुख्य लक्षण आहे. धार्मिक रोमन साम्राज्याच्या विनाशांतून ऐहिकतावादावर उभारलेलीं जीं राष्ट्रें व राज्यें निर्माण झालीं त्यांच्यांत वैराचें बीज फोफावलें. धर्माच्या ठिकाणीं राष्ट्रवाद वा वंशवरिष्ठत्व आलें. ईश्वर पाहिजेच असें बुद्धिवादी व नास्तिक व्हॉल्टेअरनें कबूल केलें; परंतु तो ईश्वर शाश्वत नीतीचा आधार म्हणून नव्हे, तर कायद्याचा आधार म्हणून, ऐहिकराज्यसंस्थेचा पोलीस म्हणून. धर्माचें स्थान घेणारी व नैतिक मूल्यांना वरिष्ठ करणारी दृष्टि व संस्कृति न आल्यामुळें आज युरोप भयंकर

संकटांत सांपडला आहे. त्यालाहि पुनः नवजीवनाच्या चळवळीची आवश्यकता आहे, जीवनदर्शनाची आवश्यकता आहे. आजच्या सगळ्या मानवी समाजाला विनाशापासून वांचवणाऱ्या नैतिक व बौद्धिक चळवळीची गरज आहे.

हिंदुस्थानलाहि अशाच नवजीवनाच्या चळवळीची गरज आहे. मात्र ती चळवळ हिंदी संस्कृतीच्या प्राचीन परंपरेच्या प्रवाहाशीं संलग्नपणें उत्पन्न झाली तरच ती प्रभावी होऊं शकेल. प्राचीन परंपरेशीं विलगपणें व विच्छिन्न स्वरूपांत ती उत्पन्न होऊं शकणार नाहीं व उत्पन्न झाली तरी ती सामर्थ्यशाली होणार नाहीं. कारण त्या त्या समाजाचा भूतकाळ त्या त्या समाजाच्या वर्तमानकाळाला जन्म देत असतो. तिचा व आधुनिक पाश्चात्य संस्कृतीचा संबंध मोठ्या भाग्यानें आला आहे. त्यामुळें पाश्चात्य संस्कृतीचीं मूल्यें तपासून आत्मसात् करण्याची महासंधि तिला लाभली आहे. त्याबरोबरच पूर्वपरंपरेनें प्राप्त झालेलें वैचारिक वैभव व ऐतिहासिक श्रेष्ठताहि चिकित्सेच्या व अनुभवाच्या कसाला लावण्याची जबाबदारी तिच्यावर पडली आहे.

## उपनिषदांच्या काळीं सुरू झालेली प्राचीन भारतीयांची वैचारिक क्रान्ति

हिंदुस्थानांतील संस्कृतींत बौद्धिक मनन, नैतिक चिंतन, कलात्मक प्रतिभेचा व्यापक व्यवसाय, सामाजिक परिवर्तन व धार्मिक क्रांति यांचा समुचित व समुचित आविष्कार होण्याचा प्रारंभ वैदिक धर्माच्या अखेरच्या काळांत झाला. वैदिक धर्मांतून उपनिषदें म्हणजे ब्रह्मदर्शन निर्माण होण्याचा हा काळ होय. निसर्गाच्या मननाकडून आत्मदर्शनाकडे या वेळीं बुद्धि वळली. या वेळपर्यंत भारतीय संस्कृतींत वैदिक यज्ञधर्म उच्चस्थानीं विराजमान झाला होता. यज्ञसंस्था समाजसंस्थेचें प्रतीक बनली होती, ऐहिक व पारलौकिक कल्पनांचा व भावनांचा जन्म तसाच विस्तार यज्ञाच्या वेदीवर झाला होता. कुटुंबसंस्था, कायदा, राज्यसंस्था, विद्या व कला यांचें पावित्र्य यज्ञानें निर्माण होत असे. ऋग्वेदांतील ऋषि म्हणतो कीं 'यज्ञ विश्वाची नाभि आहे.' यज्ञ हा निसर्गपूजक धर्माचें व्यक्त व मूर्त स्वरूप होय. निसर्ग–देवता यज्ञद्वारा मानवी संसाराला सफल करतात, अशी श्रद्धा या धर्माचें मूळ होय. कालांतरानें निसर्ग–देवता व यज्ञ यांचें मूळ तत्त्व अथवा मूल्य मनुष्यांत आहे, ही गोष्ट निदर्शनास येऊं लागल्यानंतर वैदिक धर्मांत स्थित्यंतर उत्पन्न झालें. हें स्थित्यंतर ब्राह्मण-ग्रंथांच्या काळांत अधिक स्पष्टपणें होऊं लागलें. या स्थित्यंतराचीं अनेक लक्षणें ब्राह्मण–ग्रंथांत व विशेषतः आरण्यकांत सांपडतात. याचें पाहिलें लक्षण म्हणजे देवताविषयक विचारांतील क्रांति. सर्व देवतांचीहि देवता मनुष्यांत आहे व ती म्हणजे मनुष्याचा शुद्ध आत्मा होय : हा तो क्रांतिकारक विचार होय. दुसरें लक्षण म्हणजे धार्मिक आचरणाविषयींच्या कल्पनेंतील बदल. बाह्य कर्मकांडापेक्षां मानसिक उपासना, तत्त्वचिंतन आणि नैतिक वर्तन अधिक श्रेयस्कर होत : ही ती क्रांतिकारक कल्पना होय. तिसरें लक्षण यज्ञविषयक धार्मिक भावनेंतील फरक. 'मनुष्याचें जीवन हाच यज्ञ होय; मनुष्यच मूर्तिमंत यज्ञ होय' असें वचन आरण्यकांत व उपनिषदांत अनेक ठिकाणीं आलें आहे. उदाहरणार्थ, छांदोग्य उपनिषदांत म्हटलें आहे कीं "पुरुष म्हणजे मनुष्य हा यज्ञ असून भूक, तहान व दुःख ही या यज्ञाची दीक्षा होय; खाणें, पिणें, हंसणें हे यज्ञाचेच भाग होत; तप, दान, ऋजुता, अहिंसा व सत्यभाषण ही यज्ञाची दक्षिणा होय; आणि मरण हें या यज्ञाचें समाप्तिदर्शक अवभृथ स्नान होय. देवकीपुत्र कृष्णाला त्याच्या गुरूनें या यज्ञाचा उपदेश केल्यामुळें कृष्ण तृष्णेच्या बंधनांतून मुक्त झाला." वैदिक धर्माच्या परंपरेंत क्रांतिदर्शक अशा वरील तीन लक्षणांबरोबर चौथें सामाजिक लक्षण दिसून आलें : तें वर्णव्यवस्थेसंबंधीं होय. 'आर्य त्रैवर्णिकच पवित्र होत, कारण त्यांची निर्मिति विशिष्ट देवतांनीं केली आहे' अशी कल्पना जुन्या वैदिक वाङ्मयांत रूढ झालेली दिसते. तिच्यांत बदल वेदांच्या उत्तरभागांत झाला. शूद्रवर्ण देखील देवतोद्भूत होय, असें बृहदारण्यकांत सांगितलें आहे. अशा रीतीनें चारी वर्णांचें पावित्र्य वैदिक धर्माच्या शेवटीं स्थापन झालें. या सर्व वर्णांच्या पावित्र्याचें प्रतीक असे विराट् पुरुषाची व विश्वपुरुषाची पूजा करणारे पुरुषमेध व सर्वमेध हे सामाजिक यज्ञहि त्यामुळेंच महत्त्व पावले.



अनुक्रमणिका






## वेदांतून उगम पावलेला चिकित्साप्रधान नारायणीय भागवतधर्म

वैदिकांच्या यज्ञसंस्थेतील तत्त्वचिंतनांतून आणि देवोपासनेंतून हिंदुस्थानच्या पश्चिमेस भागवतधर्म प्रादुर्भूत झाला. भागवतधर्मास प्राचीनकाळीं पांचरात्र अशी संज्ञा होती. पांचरात्र या भागवतधर्माच्या संज्ञेचें मूळ पुरुषमेधांत म्हणजे पंचरात्र–नामक यज्ञांत आहे. पंचरात्र म्हणजे पांच दिवस चालणारा यज्ञ होय. निरनिराळ्या यज्ञांस एका दिवसापासून तो हजार वर्षांपर्यंत भिन्न भिन्न मर्यादेचे काळ लागत असत. त्यावरून एकाह, द्व्यह, त्र्यह, द्वादशरात्र, सहस्रसंवत्सर इत्यादि संज्ञा यज्ञास पडत, ' पंचरात्रसंज्ञक पुरुषमेध यज्ञ नारायण ऋषीनें सर्वात्मभावप्राप्तीकरितां सर्वस्वाची दक्षिणा देऊन केला ' असें शतपथ ब्राह्मणांत म्हटलें आहे. नारायण ऋषि हा भागवतधर्माचा प्रणेता म्हणून महाभारतांत प्रसिद्ध आहे. यावरून हा धर्म वेदांत व यज्ञांत उत्पन्न झाला आणि वेदांच्या व यज्ञाच्या पलीकडे गेला असें म्हणतां येतें. या धर्मानें यज्ञाचें तात्त्विक स्वरूप बदलून टाकलें.

ईश्वर म्हणजे पुरुषोत्तम होय, ही कल्पना या भागवत धर्माचें अधिष्ठान* होय. पुरुषोत्तम म्हणजे पूर्णतेस पोंचलेला उत्तम मनुष्य होय. हिंदुस्थानच्या धार्मिक विचारसरणींत मनुष्याच्या नैतिक वर्तनाला परमार्थाचा श्रेष्ठ व एकमेव मार्ग म्हणून महत्त्व भागवतधर्मानें प्रथम आणलें. वैदिक धर्मांतलि परम रहस्य म्हणजे पुरुषोत्तमाची कल्पना होय. या कल्पनेवरील अगाधश्रद्धेमुळें वैदिक धर्माच्या परंपरेंतील वर्णव्यवस्था व वंशश्रेष्ठता यांच्या संकुचित कल्पनेला जोराचा धक्का भागवत धर्मानें दिला; आणि मनुष्यमात्र सदाचरणानें परमार्थ प्राप्त करून घेतो अशा विचाराची गरुडध्वजा आकाशांत फडकावली. भागवतधर्मांतील चिकित्सा–प्रधान विचारसरणि महाभारतांतील शांतिपर्वांत प्रगल्भपणें मांडलेली आढळते. वेद, उपनिषदें, सांख्य, योग लोकायत ( जडवाद ) इत्यादि दर्शनें, स्मृती, अर्थशास्त्रें, राजनीति, आयुर्वेद इत्यादि सर्व भारतीय विद्यांचें निष्कर्षभूत तत्त्वदर्शन भागवतधर्माच्या भूमिकेवरून मोठ्या चिकित्सक बुद्धिवादानें, शुद्ध नैतिक निष्ठेनें व औदार्यानें मांडलेलें शांतिपर्वांत आढळतें. त्यांतील परंपरेवर टीका करून व परंपरेचें मूल्यमापन करून अधिक व्यापक विचारांपर्यंत भागवतधर्म कसा पोंचला, हें सध्यां आवश्यक असलेल्या नवजीवनाच्या चळवळीच्या दृष्टीनें उद्बोधक होईल. म्हणून दिग्दर्शनार्थ येथें त्यांतील थोडी चर्चा उद्धृत करतों.

## भागवतधर्माची यज्ञसंस्था, वर्णव्यवस्था, राज्यशासन व नीतितत्त्व यांची समीक्षा

यज्ञसंस्थेवरील टीका ही भागवतधर्माच्या पाखंडीपणाचा खरा पुरावा आहे. विचारांच्या विकासक्रमांत पाखंडीपणा कसा प्रभावी असतो, याचें हें उत्कृष्ट उदाहरण होय. मात्र त्या प्रभावी पाखंडाची विधायक बाजू परंपरेपेक्षां उच्चतर कोटीची असावी लागते. यज्ञसंस्थेसारख्या वैदिक धर्माच्या केंद्रावर हल्ला चढवीत असतां भागवतधर्माला वेदांच्या शाश्वत रहस्याचें रक्षण करण्याची काळजी घ्यावी लागली. यज्ञधर्मावरील टीका पितापुत्र–संवाद–रूपानें शांतिपर्वांत मांडली आहे. पिता यज्ञधर्माच्या अनुष्ठानाला महत्त्व देणारा आणि परंपरेचा अभिमानी आहे व पुत्र त्या अभिमानांतून विवेक जागृत झाल्यामुळें मुक्त झाला आहे. पुत्र म्हणतो, ' माझ्यासारखा माणूस ' पिशाचाप्रमाणें[1] पशुयज्ञ कसा करूं शकेल ? अंतःकरणाची शांति, अध्ययन, कायावाचामनांचा योग्य उपयोग, हाच यज्ञ होय. ' चातुर्वर्ण्यावरील समीक्षा दोन वैदिक ऋषींच्या संवादांत गोंवली आहे. चातुर्वर्ण्यांतील त्रैवर्णिक आर्यांच्या वंशश्रेष्ठतेवर भरद्वाज ऋषीनें असा आक्षेप[2] घेतला कीं चातुर्वर्ण्यव्यवस्था, वंशभेद व बीजगत उच्चनीचभाव यांना कांहीं आधार नाहीं. त्वचेच्या रंगा-

---

*वेदांत ' पुरुष ' शब्द 'मनुष्य' या शब्दाचा पर्याय म्हणूनच मुख्यतः वापरलेला आढळतो.

१ म. भारत, शांतिपर्व, १७५, २६५.

२ ,, ,, १८८.








वरून ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादि भेद ओळखतां येत नाहींत; सगळ्या जातींचे मनोविकार मूलतः समानच असतात. काम, क्रोध, भय, लोभ, शोक, चिंता, क्षुधा व श्रम या सर्वांच्या ठायीं अशा स्वरूपांत दिसतात कीं त्यामुळें जातिभेद निश्चित करतां येत नाहीं. यावर भृगु ऋषीनें उत्तर दिलें कीं "वर्णभेद[3] जन्मतः नाहींत. सर्वच लोक मूळस्वभावाप्रमाणें ब्राह्मण आहेत. व्यवसाय आणि इतर वर्तन यांच्या योगानें वर्णभेद झाला आहे."

"ज्ञानामुळें उच्चत्व प्राप्त होतें व अज्ञानामुळें नीचत्व प्राप्त होतें. मनुष्याचें कर्तव्य व अकर्तव्य जो जाणतो तोच ज्ञानी होय. [4]मनुष्यत्वाचें वैशिष्ट्य नीति आणि अनीति यांचें ज्ञान होय. हें वैशिष्ट्य इतर प्राण्यांत नाहीं. शुद्ध वर्तनानें मनुष्यालाच आत्मोद्धार करतां येतो. म्हणून [5]चंडाल असला तरी त्याचें मनुष्यत्व हें शुभ व सुंदर होय. म्हणून कितीहि दुःखें प्राप्त झालीं तरी मनुष्यानें धैर्य गमावूं नये; व म्हणूनच मनुष्यानें मनुष्याचा द्वेष करतां कामा नये. माणसानें माणसाकडे प्रीतीच्या चक्षूनेंच पाहिलें पाहिजे." हंस ऋषि देवांना सांगतो कीं "दुसऱ्यानें निंदा केली वा द्वेष केला तरी मी त्याची निंदा वा द्वेष करीत नाहीं. हाच संयम अमरत्वाचें द्वार आहे. देवांनो! तुम्हांला [6]गूढ असें श्रेष्ठ तत्त्व सांगतों कीं मनुष्यत्वाशिवाय अधिक श्रेष्ठ कांहीं नाहीं." भीष्मानें युधिष्ठिराला 'सर्व धर्माचें सार प्रेम हेंच होय असें' सांगितलें आहे. भीष्मानें नैतिक वर्तनाची कसोटी अशी सांगितली कीं "[7]आपल्याशीं दुसऱ्यानें केलेलें जें वर्तन आपणांस आवडणार नाहीं तें वर्तन आपण दुसऱ्याशीं करूं नये. जें जें आपणांस इष्ट, तेंच सर्वांचें इष्ट असें समजून वर्तन करावें. प्रेम आणि सत्य यांच्या आधारावर केलेलें वर्तन हीच कर्तव्याची कसोटी होय व असें वर्तन करणाऱ्यासच अभय लाभतें."

महाभारतांतील शांतिपर्वांत [8]धर्माच्या म्हणजे नीतीच्या चर्चेचें स्वरूप रूढी व पवित्र ग्रंथांचें किंवा ईश्वरी दिव्य आदेशाचें प्रामाण्य यांच्या मर्यादेचें उल्लंघन करून पलीकडे गेलेलेंहि कांहीं ठिकाणीं दिसून येतें. पवित्र ग्रंथ व रूढी यांच्यांतील परस्परविरोध स्पष्ट दिसल्यामुळें बुद्धिवादी पद्धतीचा अंगीकार भीष्मानें केलेला दिसतो. पवित्र ग्रंथांतील आणि रूढींतील अनेक आचार वेडगळ, हिणकस, गैरलागू, घातक व अनैतिक दिसल्यामुळें भीष्माला अधिक उच्च दर्जाच्या बौद्धिक प्रमाणाची गरज उत्पन्न झालेली दिसते. भीष्म म्हणतो, 'भिन्न देश–काल–परिस्थितींत भिन्न वर्तनक्रम स्वीकारावा लागतो. नेहमींच, धर्मग्रंथांवर भरंवसा ठेवून मार्ग दिसत नाहीं. रूढ आचारांचे दोष अनेक वेळां उघडकीस येतात, म्हणून समंजस बुद्धीनें सर्व मनुष्यांच्या ठिकाणीं समत्वबुद्धि ठेवून तपासलेले असे वर्तनाचे शाश्वत नियमच संदेहस्थितींतून उत्तीर्ण होण्यास मार्गदर्शक होतात. रूढी, पवित्र ग्रंथ, ऋषी हे सर्व बुद्धीच्या उत्पत्तीला सहायक म्हणून घ्यावे. उपपत्तीनें युक्त, संयमी व शीलवान् लोकांनीं सेविलेला आणि बुद्धिशाली मनुष्यानें तपासलेला धर्मच अनुसरला पाहिजे. लोकचरित म्हणजे

---

३ महाभारत, शांतिपर्व, १८९.

४ मानुषेषु महाराज धर्माधर्मौ प्रवर्ततः। न तथान्येषु भूतेषु मनुष्यरहितेष्विह॥ म., शां., २९४।२९.

५ उपभोगैरपि त्यक्तं नात्मानं सादयेन्नरः। चण्डालत्वेऽपि मानुष्यं सर्वथा तात! शोभनम्॥
--महाभारत, शांतिपर्व, २९७।३१.

६ गुह्यं ब्रह्म तदिदं प्रब्रवीमि। न मानुषात् श्रेष्ठतरं हि किंचित्॥ --म. भा., शां., २९९।२०.

७ यदन्यैर्विहितं नेच्छेदात्मनः कर्म पूरुषः। न तत्परेषु कुर्वीत जानन्नप्रियमात्मनः ॥ म., शां., २५९।२०.
यद्यदात्मनि चेच्छेत तत्परस्यापि चिन्तयेत्। —म., शां., २५९।२२.
सर्वं प्रियाभ्युपगतं धर्ममाहुर्मनीषिणः।
पश्यैतं लक्षणोद्देशं धर्माधर्मे युधिष्ठिर! ॥ --म., शां., २५९।२५.

८ महाभारत, शांतिपर्व, २५९, २६०, २६१, २६२, २८७.








# भारतीय नवजीवनाची ऐतिहासिक पार्श्वभूमि

रूढी आणि सदाचार म्हणजे प्रतिष्ठितांचा आचार यांच्या योगानें मोहित होऊन शाश्वत धर्माचा म्हणजे मूलभूत नैतिक नियमाचा नाशहि होतो. धर्माचें किंवा नीतीचें प्रत्यक्ष स्वरूप भिन्न परिस्थितींत भिन्न दिसतें व योग्य बौद्धिक कसोटी तर सांपडणें कठिण वाटतें. परंतु नीतीचें सामान्य लक्षण बुद्धीनें सांपडतें. तेंच लागू करून युक्तता किंवा अयुक्तता निश्चित करतां येते. व्यापक अनुभव हें प्रमाण खरोखर जबरदस्त आहे. अत्यंत पापी आणि हिंसक लोकहि सत्यास अनुसरून वागूं लागले तर अनुभवांतीं त्यांच्यांतला विसंवाद व द्वेष नष्ट होऊन गेलेले दिसतात. नैतिक नियमाचा असा स्वभाव आहे कीं त्याच्या आचरणानें जीवनांतील द्वेष, भय, हिंसा व फसवणूक यांचा नाश होतो. वाणी, मन व देह यांची शुद्धि, क्षमा, धैर्य, स्मृति व सत्य या सद्गुणांचें वैशिष्ट्य असें आहे कीं जगांतील लोक आपापल्या धर्मग्रंथांप्रमाणें वागत असतां त्यांनीं जर या गुणांची उपेक्षा केली तर त्यांना वैफल्याचा अनुभव आल्याशिवाय राहत नाहीं. नीतीचे शाश्वत नियम हे सर्वांच्या अनुभवाच्या कसोटीस उतरतातच. त्याकरितां धैर्य व प्रज्ञा मात्र पाहिजेत. प्रज्ञा हा माणसाचा सर्वश्रेष्ठ ठेवा आहे.

महाभारतांत विचारांची पातळी याच प्रकारची सर्वत्र सारखी नाहीं. पवित्र-ग्रंथ-प्रामाण्य, अवतारमहिमा व रूढींवरील अंधश्रद्धा याहि गोष्टी त्यांत भरपूर आढळतात. परंतु त्यांबरोबरच नवजीवनाच्या प्राचीन चळवळीची निशाणी त्यांत चांगल्या रीतीनें सांपडते, हें वरील विचारावरून स्पष्ट ध्यानांत येतें.

महाभारतांतील शांतिपर्वांत वैदिक धर्माच्या परंपरेची समीक्षा करीत असतांच नीतिप्रधान व सर्वमानवव्यापी धर्माची मांडणी केली. तींत समाजांतील महत्त्वाच्या संस्थांची मौलिक समालोचना करीत असतां राज्यसंस्थेचें देखील खोल विवरण केलें. मनुष्याच्या मूळ स्वभावांतच पाप व पुण्य यांच्या विवेकाचें सामर्थ्य—नराचा नारायण होण्याचें सामर्थ्य भागवत धर्मास दिसलें. प्रत्येक नरांतच नारायण असल्यामुळें त्या नारायणाची प्रतीति माणसास कल्याणाच्या मार्गावर राखण्यास समर्थ असल्यामुळें मनुष्याला दंडाच्या जोरावर जबरदस्ती करणाऱ्या शासनसंस्थेची खरोखर नित्य व स्वभावतःच आवश्यकता आहे, हें तत्त्वतः भागवतधर्मास मान्य झालें नाहीं. स्वधर्माची जाणीव असलेले आणि विकारांना व भावनांना विवश नसलेले लोक दंडधारी, हिंसाधिष्ठित शासनसंस्थेवांचून परस्परांच्या सहकारितेनें योगक्षेम चालवून पुरुषार्थ साधतात, असा भरंवसा भागवतधर्माच्या तत्त्वज्ञानांत दिसतो. समाजांत जेव्हां विवेक लुप्त होऊं लागतो तेव्हां मात्र लोकच समयबंध करून अनवस्था व मात्स्यन्यायजन्य विनाश टाळण्याकरतां राज्यसंस्था निर्माण करतात, अशी राज्यसंस्थेच्या उद्भवाची उपपत्ति नारायणीय धर्म सांगतो. तत्त्वज्ञानी राजाच समाजाचा खरा शासक असावा असेंहि प्लेटोप्रमाणें हा धर्म सांगतो.

यज्ञसंस्था, वर्णव्यवस्था, राज्यशासन आणि मूलभूत व सनातन नीतिधर्म यांचें परीक्षण कित्येक ठिकाणीं शब्दप्रामाण्याची आणि ग्रंथप्रामाण्याची उपेक्षा करून चिकित्सेच्या भूमिकेवरून भागवतधर्मानें केलें. उपनिषदें, सांख्य व योग या दर्शनांतील विश्वविषयक व मोक्षविषयक पारमार्थिक विचार, त्यांतील तार्किक सुसंगति निश्चित करून, भागवतधर्मानें आत्मसात् केले; असें करतांना त्यानें मनुष्याचें अंतिम ध्येय मानवी स्वभावाच्या मर्यादेबाहेर आणि दृश्य विश्वाच्या भौतिक स्वभावाच्या मर्यादेबाहेर नेऊन ठेवलें. कारण, मानवी स्वभाव व भौतिक विश्वाचा स्वभाव यांची कल्पना, ध्येयाला पूर्णता येईलच, असें आश्वासन देत नाहीं. कारण या जगांत, ऐहिक सामाजिक वा वैयक्तिक प्रगतीचें जें जें आदर्श स्वरूप ठरवावें त्याला पोंचतांच त्यांत पतनाला नेणाऱ्या शक्तींचा प्रभाव उत्कटतेस येतो. सर्वच सांत व सदोष आहे अशी कल्पना येऊन अनंत ध्येयाच्या पूर्तीकरितां लागणाऱ्या अमर्याद शौर्याचा धीर खचतो. म्हणून वैष्णवधर्म मानवीस्वभावाच्या मर्यादांचें व विश्वाच्या मर्यादांचें उल्लंघन करून ध्येयाला विशुद्ध, पूर्ण व अनंत ठेवण्याकरितां (Transcendental) सर्वातीत सच्चिदानंद पुरुषोत्तमाला शरण जातो. तेथेंच बुद्धिवाद (भागवत धर्माच्या भाषेंत प्रज्ञावाद) श्रद्धेचें रूप धारण करतो.










## भौतिकवादी लोकायत मताची शांतिपर्वावरील छाया

भागवतधर्माच्या उत्थानाचे समयीं परमेश्वर व परलोक न मानणारे दार्शनिक विचारहि अस्तित्वांत आले होते, असें शांतिपर्वातील भरद्वाज, शुक्र व बृहस्पति यांच्या लोकायत नामक पाखंड—वादावरून समजून येतें. या लोकायत—मताचा सारांश असा: पांच बाह्येंद्रियें आणि सहावें अंत:करण यांच्या योगानें उत्पन्न होणाऱ्या प्रत्यक्ष ज्ञानावरच सर्व मानवी विचारांचा डोलारा उभारला जातो. तर्क व धर्म—ग्रंथ यांतील सर्व कल्पनांचें पृथक्करण करून जर अर्थ काढला तर त्याचें मूळ प्रत्यक्ष ज्ञान हेंच होय, असें निश्चित करतां येतें. म्हणून ईश्वर व परलोक यांच्यासंबंधीं कल्पना प्रत्यक्ष अनुभवाच्या आधारेंच निर्माण झाल्या आहेत व त्या अवास्तव आहेत. प्रत्यक्ष अनुभव 'तीनच कल्पना तत्त्वतः सत्य आहेत ' असें सांगतो. पहिली कल्पना:—दृश्य विश्व सतत बदलणारें आहे व तोच नियम मानवी जीवनालाहि लागू आहे; सुखदुःखांच्या परिवर्तनक्रमांतून कोणीहि सुटला नाहीं. दुसरी कल्पना:—जगांतील नित्य होणारा बदल हा जगांतील वस्तूंचा स्वभावधर्म आहे; हा बदल दुसरा कोणीहि घडवून आणत नाहीं. हा स्वभावधर्म अबाधितपणें व अनिवार्यपणें आपलें कार्य करीत असतो. तिसरी कल्पना:—जगाचा बदलण्याचा क्रमहि अत्यंत निश्चित स्वरूपाचा आहे; तो क्रम कोठेंहि कशानेंहि बदलूं शकत नाहीं. या अपरिहार्य क्रमासच काल म्हणतात. क्षणभंगवाद, स्वभाववाद आणि कालवाद असे तीन वाद या लोकायत—मतांत उत्पन्न झाले. असुरराज प्रल्हाद, बलि, विरोचन इत्यादिकांनीं हे वाद शांतिपर्वांत सांगितले आहेत. हीं लोकायत जडवादी मतें अनासक्ति व विरक्ति यांचेंहि समर्थन करूं शकलीं; परंतु शाश्वत नीतितत्त्वांचें समर्थन करूं शकलीं नाहींत. आजपर्यंत जडवादांत हाच दोष राहिला आहे.

भागवत—धर्माचा उदय व प्रसार प्रथम उत्तर हिंदुस्थानच्या पश्चिमेस जेव्हां झाला, त्याच सुमारास उत्तर हिंदुस्थानच्या पूर्वेस बिहारमध्यें वैदिक धर्माच्या व उपनिषदांच्या विचारांतून एक मोठी वैचारिक चळवळ उद्भवली. त्या चळवळींत अगणित प्रकारच्या चिकित्सक व मूलगामी प्रकारच्या विचार-प्रवृत्ती मिसळल्या होत्या. त्रिपिटकांत अशा चौसष्ट पाखंडांचा निर्देश केला आहे. या पाखंडांमधील गौतम बुद्धाची चळवळ उत्कर्षाच्या शिखरास पोंचली. उपनिषदांतील परिव्राजकांचा विचारच अधिक विशद स्वरूपांत गौतम बुद्धानें विकासाला पोंचविला. मानवी जीवनाचा अपरिहार्य आधार असलेल्या ऐहिक भौतिक स्वास्थ्यास भागवतधर्मानें अनासक्तीच्या आधारें निर्दोष व पवित्र केलें. उलट श्रमणांनीं, परिव्राजकांनीं व बुद्धानें ऐहिक भौतिक जीवनाची उपेक्षा केली, हा दोघांतला फरक आहे. परंतु बुद्धाच्या विचारसरणीचीं इतर अनेक क्रांतिकारक वैशिष्ट्यें आहेत.

## बुद्धाचा बुद्धिवाद, अनुभवनिष्ठ नीतिसिद्धान्त व जीवनकेन्द्रित तत्त्वदृष्टि

जगांतील इतर कोणत्याहि धर्मसंस्थांच्यापेक्षां बुद्धाची विचारसरणी खरोखरच अनेक दृष्टींनीं अत्यंत विलक्षण आहे; आणि हें वैलक्षण्य विस्मयजनकहि आहे. इतर धर्मसंस्थापक व महात्मे पुरातन कालापासून आजपर्यंत सांगत आले आहेत कीं 'आम्हांस मिळालेला धार्मिक आदेश देवाचा आहे, त्यावर श्रद्धा ठेवा. चिकित्सेपासून त्याला दूर ठेवा.'. उलट बुद्धानें सांगितलें कीं "हे भिक्षूंनो, तापवून, तुकडे पाडून आणि घांसून ज्याप्रमाणें शहाणा मनुष्य सुवर्ण घेतो त्याप्रमाणें माझा उपदेश तुम्ही घ्या; तो माझ्या मोठेपणामुळें घेऊं नका.[९]" कालाम नांवाच्या खेडुतांना बुद्ध म्हणाला कीं ' मी जें [१०] सांगतों, तें परंपरेनें मान्य केलें आहे, प्रमाणभूत ग्रंथांत सांगितलें आहे, त्याची शैली चांगली आहे, तें तात्पुरत्या व्यवहाराला उपयोगी आहे, तें कोणीं आचार्यानें सांगितलें आहे,

---

९ तापाच्छेदाच्च निकषात्सुवर्णमिव पण्डितैः। परीक्ष्य भिक्षवो ग्राह्यं मद्वचो न तु गौरवात्॥
—ज्ञानसारसमुच्चय.

१० अंगुत्तर निकाय, ३।६५३.








मोठ्या परिश्रमानें कोणीं सांगितलें आहे किंवा वाद-विवादाला उपयोगी आहे, म्हणून तें स्वीकारूं नका. तर तुम्हांस त्यांतील गुण आणि निर्दोषता समजली व त्याचें आचरण केलें असतां हित होतें असें दिसलें तर तें स्वीकारा." निर्वाणाच्या अगोदर थोड्या दिवसांपूर्वी आनंद नामक प्रिय शिष्याला बुद्ध म्हणाला कीं, "मीं जो उपदेश केला आहे, त्यांतील सत्य इतर धर्मांतील सत्यांप्रमाणें, एक भाग गुप्त व एक भाग उघडा, अशा प्रकारचें नाहीं." सारिपुत्र या शिष्याच्या प्रश्नास उत्तर देतांना बुद्ध म्हणतो कीं, "हे शिष्यांनो, गूढता (गुप्तता) तीन ठिकाणीं राहते. स्त्रिया, पुरोहितांचा धर्म आणि असत्य सिद्धांत." "सत्याच्या बाबतींत प्रकाश देणारा दीप म्हणजे स्वतःचें अंतःकरण होय. आत्मदीप, आत्मशरण व अनन्यशरण असाच मनुष्य खरा नैतिक (धार्मिक) बनूं शकतो" असें महापरिनिब्वान सुत्तांत (३२, ३३, ३५) बुद्ध म्हणतो.

बुद्ध स्वतःच्या धर्मास मध्यम मार्ग असें नांव देतो. त्यांत कायक्लेशाचा किंवा सांसारिक सुखासक्तीचा मार्ग टाळला आहे. म्हणून त्यास मध्यम मार्ग म्हणतात. बुद्धाला ज्या सत्याचा साक्षात्कार झाला तें सत्य शुद्ध मानवी अनुभवाचें सार असें आहे. परलोक व ईश्वर अशा प्रकारचें मानवी अनुभवाच्या पलीकडचें कसलेंहि तत्त्व त्यांत नाहीं. तें सत्य नैतिक असून बुद्धीला ग्राह्य असें आहे. दुःख, दुःखाचीं कारणें, दुःखनाश आणि दुःखनाशाचीं साधनें हीं चार आर्य सत्यें बुद्धाला पवित्र बोधिवृक्षाखालीं दिसलीं. शुद्ध बुद्धिगम्य नैतिक धर्माच्या विचाराला प्राधान्य देणारा व अनुभवाच्या क्षेत्रांत सर्वस्वीं धर्माला बद्ध करणारा बुद्ध होता. त्याच्यानंतर त्याच्या धर्मांतहि गूढवाद व परलोकवाद शिरलेच. त्याच्या अनुयायांनीं त्याला ईश्वर बनविलें. याचा अर्थ असा कीं त्यानें प्रारंभिलेल्या वैचारिक क्रांतीची वाढ न होतां तिचें विकृत रूपांतर झालें.

मनुष्याच्या विचारांना ऐहिक जीवनाच्या नैतिक विकासांत केंद्रित करण्याला बुद्धानें वरिष्ठ स्थान दिल्यामुळें विश्वविषयक व पारलौकिक विचारांना त्यास दुय्यम स्थान द्यावें लागलें. विश्वविषयक तत्त्वज्ञान त्यानें सांगितलें; परंतु नैतिक तत्त्वज्ञानाला पोषक अशा तेवढ्याच स्वरूपास जास्त महत्त्व देऊन त्यानें तें चिंतनांत घेतलें. विश्वविषयक तत्त्वज्ञानाला सर्वस्वीं महत्त्व देणाऱ्या पंथांना धैर्यच्युत करण्याकरितां विश्वविषयक तत्त्वज्ञानांतील अंतिम प्रश्नांना त्यानें अनेक वेळां बगल दिली आहे. पोट्ठपाद ब्राह्मणाच्या दहा प्रश्नांना त्यानें 'नेहमीं अनुत्तरित राहणारे प्रश्न' असें म्हटलें आहे. जग शाश्वत आहे कीं अशाश्वत आहे, तें सांत आहे कीं अनंत आहे, जीवात्मा व शरीर एक आहेत कीं भिन्न आहेत, बुद्ध निर्वाणा-नंतर असतो का नसतो इत्यादि प्रकारचे ते प्रश्न आहेत. या प्रश्नांचा मनुष्याच्या हितार्शी व नीतीशीं कांहीं संबंध नाहीं, असें तो म्हणतो. त्यानें तत्त्वज्ञानांतील विश्वव्यापक तत्त्वांच्या बाबतींत कांहीं ठिकाणीं डेव्हिड ह्यूमची वृत्ति अंशतः स्वीकारली आहे. तो अनुभववादाला अधिक महत्त्व देतो. कित्येक वेळां तो बिशप् बर्कले व कांट यांच्याप्रमाणें मानसिक विश्वालाच प्रमाण समजतो. परंतु नैतिक तत्त्वांच्या निश्चयाकरितां ईश्वर व परलोक यांची मातब्बरी कांटप्रमाणें त्याला वाटत नाहीं.

तेविज्जसुत्तांत त्यानें अनिर्वचनीय—ईश्वरोपासकांची किंवा अनिर्वचनीय—ब्रह्मोपासकांची थोडी थट्टा केली आहे. तो म्हणतो, "या ब्रह्मोपासकांची स्थिति अज्ञात सुंदरीवर प्रेम करणाऱ्या युवकाप्रमाणें आहे. एक तरुण पुरुष एका जनपद—कल्याणीवर (राष्ट्रांत सर्वांमध्यें सुंदर असलेलीवर) प्रेमलुब्ध होता. त्याला लोकांनीं विचारलें, 'ती कोण आहे? ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य कीं शूद्र?' तो म्हणाला, 'तें मला माहीत नाहीं. परंतु ती मला फार आवडते.' पुनः लोकांनीं विचारलें, 'ती काळी आहे कीं गोरी आहे? तिचा रंग कसा आहे?' 'तें मला माहीत नाहीं, परंतु मला ती फार आवडते' असें तो म्हणाला. पुनः लोकांनीं विचारलें, 'ती उंच आहे कीं मध्यम आहे कीं ठेंगणी आहे?' तो म्हणाला, 'तें मला माहीत नाहीं; परंतु मला ती फार आवडते.'"

कार्यकारणभावानें विश्व बद्ध असून तें दीपज्योती-प्रमाणें किंवा विद्युत्प्रमाणें अथवा मेघाप्रमाणें किंवा वाहणाऱ्या नदीप्रमाणें चंचल व क्षणभंगुर आहे, असें विश्वविषयक तत्त्व बुद्धानें सांगितलें, यावरूनच बुद्धाची विचारसरणी अज्ञेयवादी होती असें म्हणतां








येणार नाहीं. जीवनाचें तत्त्वज्ञान विश्वविषयक चिंतनाच्या पांडित्यापेक्षां अधिक श्रेष्ठ होय हें तत्त्व विवरिणें हें त्याचें मुख्य उद्दिष्ट होतें. विश्व—तत्त्वज्ञानाची संपूर्ण उपेक्षा त्यानें केली नाहीं. ज्ञानाचा आचरणावर व जीवनावर परिणाम कसा घडवितां येईल, याच विचारानें तो भारला होता. कोशांबीजवळील शिंशपावनांत बुद्ध एकदां राहिला होता. तेथें एकदां शिष्य जमले असतां त्यानें शिंशप वृक्षाचीं पानें हातांत घेऊन म्हटलें, 'माझ्या हातांत पानें जास्त आहेत कीं झाडावर जास्त आहेत? झाडावर जास्त पानें आहेत. त्याप्रमाणेंच मी सांगतों त्यापेक्षां माझ्या हृदयांत अधिक विद्या सांठलेली आहे; परंतु ज्या विचारांचा संबंध पावित्र्य, कामनाबंधांतून मुक्तता, शांति, ज्ञान व निर्वाण यांच्याशीं पोंचत नाहीं तें मीं तुम्हांस सांगत नाहीं.' मालुंक्य—पुत्ताला विश्व—तत्त्वज्ञानाची हौस फार होती. त्यानें तत्त्वचर्चेचा हेका धरून म्हटलें, 'भगवन्, तुम्हांस जर कांहीं गोष्टी कळत नसतील, तर तसें कबूल करावें. परंतु टाळाटाळ करूं नये.' यावर बुद्धानें शांतपणें दृष्टांतपूर्वक उत्तर दिलें, "एकाद्या मनुष्यास विषलिप्त बाण लागावा, त्याच्या नातेवाइकांनीं बाण काढून उपचार करण्याकरितां वैद्यास आणावें, परंतु बाणविद्धानें म्हणावें कीं, 'जोंपर्यंत तीर मारणारा कोण आहे, कोणत्या जातीचा आहे, त्याचें नांव व गोत्र काय आहे, त्याची उंची काय आहे, हें मला कळलें नाहीं तोंपर्यंत मी हा बाण काढूं देणार नाहीं.' परंतु त्यास या गोष्टींची माहिती होईपर्यंत तो जिवंतच राहूं शकणार नाहीं. विश्वव्यापक प्रश्नांचीहि गोष्ट तशीच आहे. म्हणून निकडीच्या प्रश्नांचा म्हणजे दुःख, चिंता, हिंसा, जन्म, मृत्यु, जरा, इत्यादि गोष्टींचा विचार करून त्यांच्या बंधनांतून मुक्त होण्याचा विचार करावा".

## बुद्धनिर्वाणाचा अर्थ

बुद्ध हा त्या वेळच्या फार प्रभावी व सामर्थ्यशाली वैदिक धर्माचा प्रतिपक्षी होता. परंतु साक्रेटीस व ख्रिस्त यांच्याप्रमाणें तो दुर्दैवी हुतात्मा झाला नाहीं, किंवा त्यांच्याप्रमाणें त्याला यातनाहि सोसाव्या लागल्या नाहींत. ऐशींव्या वर्षी अत्यंत आनंदांत शांतपणें व शिष्यपरिवारांत, निर्मल आकाशांत सूर्य अस्ताला जावा त्याप्रमाणें, परिनिर्वाणपदास तो प्राप्त झाला. महान् राजे, बडे पुरोहित, व्यापारी, सामान्य लोक आणि समाजाच्या खालच्या थरांतील दीन व हीन लोक या सर्वांशीं त्याचा संबंध आला होता. शिष्यसंख्याहि त्यास फार मोठी लाभली. परंतु मनाला कायम खेद वाटावा, अशी भयंकर घटना त्याच्या आयुष्यांत सांपडत नाहीं. याचें कारण असें कीं त्याची उपदेश—पद्धति व चर्चेची पद्धति या आग्रहशून्य होत्या. त्याचा शांत मतपरिवर्तनावर भर होता. उद्वेगकर वाक्यांनीं प्रचार न करणारे अनुयायी त्याला लाभले होते. स्वतः बुद्ध तर निरपवाद विनयशीलता व सौम्यता यांनीं ओतप्रोत भरलेल्या स्वभावाची आदर्श प्रतिमाच होता. परमताबद्दल त्वेष व द्वेष यांचा स्पर्शहि त्याच्या मनाला नव्हता. बौद्ध धर्माची प्रचारपद्धति प्रतिपक्षाच्या मनाचा ठाव घेणारी होती. अहिंसा देखील दोन प्रकारची असते; हिंसक व अहिंसक. बुद्धाच्या अहिंसेला हिंसेचा स्पर्श कोणत्याहि बाजूनें झाला नाहीं. प्रतिपक्षास त्यानें विचारप्रवृत्त केलें. बौद्ध धर्माइतका शांततेच्या सामर्थ्यावर संपूर्ण भिस्त ठेवून प्रभावी व विजयी झालेला दुसरा कोणताहि धर्म भूतलावर झालेला इतिहासास ज्ञात नाहीं.

बुद्धक्रांतीचा परिणाम हिंदी जीवनावर व तत्त्वदृष्टीवर कायमचा झाला. बुद्धपूर्व भारतीय इतिहास वाङ्मयाशिवाय व भूमिगत अल्पावशेषांशिवाय उपलब्ध होत नाहीं. उपनिषदांपासून तो बुद्धधर्माच्या स्थापनेपर्यंतचा भारतीय इतिहासांतील काळ वैचारिक व सांस्कृतिक नवजीवनाच्या परम सीमेस पोहोंचलेला दिसतो. हीच भविष्यकालीन भारतीय नवजीवनाची ऐतिहासिक पार्श्वभूमि होय.

अनुभवाच्या आधारानें निष्पन्न होणारें नैतिक सत्य बुद्ध सांगत होता. परंतु त्याचें नीतिशास्त्र निवृत्तिवादी होतें. या निवृत्तिवादाच्या विरुद्ध प्रत्यक्ष ऐहिक जगालाच सत्य मानणारा 'लोकायत'—संज्ञक जडवादी विचारसंप्रदाय बुद्धाच्या काळीं अस्तित्वांत होता.








महाभारतांतील शांतिपर्वांतहि भरद्वाज व शुक्र हे जडवादी म्हणून सांगितले असून तेथें भरद्वाजानें [11]देह आणि आत्मा हे भिन्न कसे नाहींत याचें विवरण केलेलें आहे. बौद्धांच्या त्रिपिटकांत अजित-केशकंबली ह्या जडवाद्याचीं मतें सांगितलीं आहेत. दीघनिकायांत 'पायासि सुत्तंत' या प्रकरणांत पायासि राजन्य याची जडवादी विचारसरणि सांगितली आहे. जैनांच्याहि ग्रंथांत या राजन्याची तीच विचारसरणि आली आहे. जडवाद्यांचे स्वतंत्र ग्रंथ धार्मिक लोकांनीं नष्ट केले असल्यामुळें त्यांची विचारसरणि त्यांच्या विरुद्ध असलेल्या ग्रंथांवरच भिस्त ठेवून मिळवली पाहिजे. बुद्धाच्या काळांत [12]विचारांची फार मोठी चळवळ उत्पन्न झाली होती. परंतु शुद्ध बुद्धिवादी आणि जडवादी विचारसरणीचा पराभवच त्या काळांत झाला. तथापि ऐतिहासिक दृष्टीनें त्यांचें महत्त्व नाकारतां येत नाहीं.

---

११ म. शां., १८६, २१८।२३-२९, २३७.

१२ दीघनिकाय १।१७. यांत बुद्धाच्या काळीं प्रचारांत असलेल्या बासष्ठ मतान्तरांचा निर्देश आहे.

---

## कोलंबस ते मार्शल—

युरोपची विस्कटलेली आर्थिक घडी पुन्हां बसविण्याकरितां युरोपिअन रिकव्हरी प्रोग्रामच्या रूपानें अमेरिकेंतून मार्शल-मदतीचा प्रचंड लोंढा युरोपकडे वहात आहे. अमेरिका जर आज नसती तर युरोपचें काय झालें असतें हा विचार मनांत येऊन युरोपमधील कांहींजणांच्या कल्पनाशक्तीला भरती आली असल्यास नवल नाहीं. अशाप्रकारें आपल्या कल्पनाशक्तीनें स्वैर संचार करणाऱ्या एका युरोपीय पत्रपंडितानें एक मजेदार असा व्यापारी हिशेब करून पाहिला आहे ! कोलंबसानें अमेरिका शोधून काढिली,- त्यावेळीं युरोपला अमेरिका शोधून काढण्यापायीं किती खर्च आला असेल ? स्पेनच्या दरबारानें कोलंबसाच्या सफरीप्रीत्यर्थ हल्लींच्या आर्थिक परिभाषेंत सुमारें अकरा हजार पौंड खर्च केले असावेत, असें त्या पत्रपंडिताचें म्हणणें आहे. हा आंकडा त्यानें असा काढला आहे : स्पॅनिश आरमाराचा मुख्य दर्यासारंग म्हणून क्रिस्टोफर कोलंबसचा वार्षिक पगार हल्लींच्या मानानें ६४० पौंड असावा. त्या संशोधकाची सफर साडेसात महिन्यांत संपली. म्हणजे त्या मानानें त्याचा पगार ४०० पौंड होतो. त्याच प्रमाणांत त्याच्या कप्तानांचा पगार ४५० पौंड आणि खलाशांचा ४२०० पौंड होतो. जीं तीन जहाजें त्यानें आपल्या बरोबर नेलीं होती तीं सुसज्ज करायला अंदाजें ५६०० पौंड लागले असावेत. असे एकंदर सुमारें अकरा हजार पौंड अमेरिका शोधून काढायला युरोपला लागले ! त्याच अमेरिकेनें मार्शल योजनेप्रमाणें आज युरोपला—डबघाईस आलेल्या या जुन्या जगाला—पांचशें कोट डॉलर म्हणजे सुमारें एक कोट पौंड मदत केली आहे. केवळ अकरा हजार पौंडांच्या भांडवलावर केवढा हा प्रचंड नफा !

—'हिंदू'वरून (सारांशरूपानें)-१९।७।४८










भारतीय साहित्य व संस्कृति

# नझरुल इस्लामचीं कीर्तनें

प्रा. प्रभाकर माचवे

बंगालचे विप्लवी कवि म्हणून एके काळीं रवींद्रनाथांनीं गौरविलेले, हल्लीं विक्षिप्त, नुकतेच ५० वर्षांचे झालेले उत्कृष्ट कवि काझी नझरुल इस्लाम अत्यंत आवेशपूर्ण राष्ट्रीय गीतांचे व सुंदर भावगीतांचे लेखक आहेत. त्यांच्या सूर-साकी ग्रंथांत त्यांच्या सर्व रसांचीं गीतें संग्रहीत आहेत. यांत अनेक राधा-कृष्ण-विषयक कीर्तनेंहि आहेत. नझरुलच्या साहित्यसेवेचा गौरव म्हणून पश्चिमबंगाल-सरकार गेल्या दोन वर्षांपासून त्यांना दोनशें रुपये माहवार पन्शेन देतें.'सपेरा' या उत्कृष्ट चित्रकथेचे ते लेखक आहेत. 'अग्निवीणा,' 'सर्वहारा' इत्यादि कैक काव्यसंग्रह पूर्वीं ब्रिटिश शासकांनीं जप्त केले होते. १९३९सालीं 'सह्याद्रीं'त त्यांच्या 'विद्रोही' (बंडखोर) कवितेचा मराठी गद्यानुवाद मीं प्रसिद्ध केला होता. मुसलमान असूनहि राधाकृष्णांवर फार सुरेख गीतें त्यांनीं लिहिलीं आहेत. येथें त्यांचीं दोनतीन कवनें 'सूर-साकी'तून देतों.

मूळ—

### १ बागेश्री मिश्र-काफी

छलछल नयने मोर पाने चेयोना।
जाबे जाओ, नयने जल निये जेयोना॥
थाके व्यथा थाक बुके
जाओ तूमि हासि मुखे
अमार चाँदिनी राति घन मेघे छेयोना॥
रंगीन पियालाते मम लोना अश्रुजल ढालि
पान'से क'रोना नेशा, जीवनभरा व्यथा खालि।
भूलिते चाहिजे व्यथा
मने एनोना से कथा,
करुन सुरे विदाय-गीति गेयोना॥

अनुवादः--

असें डबडबलेल्या डोळ्यांनीं माझ्याकडे पाहूं नको! जायचें असेल तर खुशाल जा; पण डोळे पाणावून जाऊं नको!
व्यथा असेल तर हृदयांत राहूं दे.
जातांना हंसतमुख बनून जा.
माझ्या चांदण्या रात्रीला निबिड मेघांनीं झाकाळूं नको॥' माझ्या रंगीत प्याल्यांत खारें अश्रुजल ओतून, तें प्राशून, असला नशा करून काय अर्थ ? फक्त जीवन-भर निव्वळ व्यथाच ना ?
चुकून देखील ती व्यथा आवडेल
असली गोष्ट मनांत आणूं नको.
करुण स्वरांत निरोपाचें गाणें गाऊं नको॥

---

### २ पिलू खम्माच-काफी

हृदय केनो चाहे हृदय आमि जानि मन जाने।
जाने नदी केन जे से छूटे जाय सागर पाने॥
केनो मेघ बारि चाहे जाने चातक जाने मेघ
जाने चकोर दूर गगनेर चाँद केनो तारे टाने॥
कुसूम केनो चाहे शिशीर, जाने शिशीर जाने फूल,
जाने बुलबूल, आछे काँटा, तबू जाय गुल-बागाने॥
नयन चाहे नयन-बारि मन चाहे मनोव्यथा,
प्राण आछे जार सेई जाने केनो चाय प्राण प्राणे॥








अनुवादः—

हृदयाला हृदय कां आवडतें, कसें आवडतें, तें फक्त मला ठाऊक कीं मनाला ठाऊक.

नदी सागराच्या भेटीसाठीं जी अनिर्बंध वाहत जाते, तें रहस्य फक्त नदीलाच ठाऊक.

मेघाच्या थेंबांसाठीं प्रेम कसें उत्पन्न होतें तें मेघ जाणे कीं चातक जाणे.

दूर आकाशांतील चंद्र कसा आहे हें चकोराला ठाऊक किंवा ताऱ्यांना ठाऊक !

फुलाला शिशिर ऋतु कां आवडतो तें शिशिर जाणे व फूल जाणे ! कांटे असूनहि फुलबागेंत बुलबुल पक्षी कां जातो तें बुलबुलास ठाऊक !

डोळ्यांना आंसू व मनाला व्यथा आवडते. ज्याला अंतःकरण असेल तोच या जीवांजीवांची ओढ ओळखील.

---

### ३. भैरवी–एकताला

मोरा एकवृन्ते दूटी कुसुम हिंदू–मुसलमान।
मुसलिम तार नयनमणि, हिंदू ताहार प्राण॥
एक शे आकाश मायेर कोले
जेन रवि शशी दोले,
एक रक्त बुकेर तले, एक शे नाड़ीर टान॥
एक शे देशेर खाइ गो हाओया, एक शे देशेर जल,
एक शे मायेर वक्षे फले एक फूल ओ फल।
एक शे देशेर माटीते पाई,
केउ गोरे केउ श्मशाने ठाँई,
मोरा एक भाषाते मा के डाकि, एक सूरे गाई गान॥

अनुवादः—

माझ्या एकच देंठावर दोन फुलें आहेतः—
हिंदू व मुसलमान
मुस्लिम त्याचा हृदयमणि तर हिंदू त्याचा प्राण आहे.
आकाशरूपी आईची मांडी एकच आहे,
जिच्यावर चंद्र व सूर्य दोघेहि डोलतात.
दोघांच्या हृदयांत एकच रक्त आहे, दोघांच्या
नाडींत एकच स्पंदन आहे.
एकाच देशाची हवा दोघे खातात, एकाच देशाचें
पाणी पितात.
एकाच आईच्या हृदयावर निर्माण झालेलीं
फुलेंफळें डंवरतात.
एकाच देशाची माती त्यांना लाभते
एकाला कबरस्तान व दुसऱ्याला श्मशान मिळतें.
एकाच भाषेंत आईला बोलव, एकाच
घरांत गाणें गा !

---

---

एकदां बादशहा इब्राहिम आपल्या सिंहासनावर बसला होता. त्याला एकाएकीं आपल्या राजवाड्याच्या गच्चीवर कांहीं आरडाओरड, धांवपळ, पावलांचे दाणदाण आवाज होत असलेले ऐकूं आले. त्याला वाटलें, " वर कोण दाणदाण करीत चालत आहे ? ". त्यानें खिडकींतून बाहेर हांक मारून विचारलें, " कोण आहे रे वर ? ". गोंधळलेले पहारेकरी मुजरा करून म्हणाले, " आम्हींच आहों, सरकार. तपास करीत फिरत आहों. " बादशहानें विचारलें " तपास ? कसला तपास ?". त्यांनीं उत्तर दिलें, " खाविंद, आपल्या उंटाचा आम्ही शोध करीत आहों. " बादशहानें आश्चर्यानें विचारलें, "अरे, उंटाचा शोध घराच्या गच्चीवर का कोणी करतें !" पहारेकऱ्यांनीं उत्तर दिलें, " खाविंद, आपलें उदाहरण आमच्यापुढें आहे. सिंहासनावर बसून का अल्लाची प्राप्ति कोणाला झाली आहे ? "

--जलालुद्दिन रुमी.








स्फुट लेख—

# सहदेव 'रोम'(इटली)ला गेला होता काय?

प्रा. वि. व. आठवले

महाभारताच्या, भांडारकर–प्राच्यविद्या–संशोधन-संस्थेनें प्रकाशिलेल्या सभापर्वाच्या Critical Editionमध्यें सहदेवाच्या दक्षिण–दिग्विजयाबद्दल असा श्लोक आहेः—" अंताखीं चैव रोमां च यवनानां पुरं तथा। ततः कच्छगतो धीमान् माद्रिवतीसुतः ॥". यावर भाष्य करून एडिटरनीं प्रस्तावनेंत लिहिलें आहे कीं ' अंताखी म्हणजे Syriaमधील Antioch, रोमा म्हणजे इटलीमधील रोम शहर व यवनानां पुरं म्हणजे Egyptमधील Alexandria असलेंच पाहिजे.' सहदेव हा पांड्य, केरळ, अंताखी, रोम वगैरे देशांतून खंडणी वसूल करीत भडोचकडे गेला असा स्पष्ट संदर्भ असतांना भूमध्यसमुद्राकडील प्रदेश सहदेवानें जिंकले हा जांवईशोध लावून महत्त्वाचें संशोधन केल्याची ग्वाही एडिटरनें देणें म्हणजे भूगोलशास्त्राचें अज्ञान प्रकट करणें होत नाहीं काय?

म्हणून याबाबत महाभारताचे जनरल एडिटर डॉ. वेलवलकर यांना खुलासा करण्याबद्दल विनंति केली. डॉ. वेलवलकरांकडून याबाबत कांहींहि खुलासा मिळूं शकला नाहीं. यानंतर याबाबत भां. प्रा.वि.सं. संस्थेच्या चिटणिसांना विचारलें असतां त्यांच्याकडून अशा अर्थाचें उत्तर आलें कीं सभापर्वाचे एडिटर प्रो. एड्गर्टन हे याबाबत खुलासा करूं शकतील.

त्याप्रमाणें प्रो. एड्गर्टन यांना मीं लिहिल्यावर त्यांच्याकडून अमेरिकेहून मला अशा अर्थाचें उत्तर आलें: " रोम व यवनपुर हीं नांवें तेथें आल्यामुळें मीं अनुमान काढलें कीं या वाक्यांचा लेखक रोम या शहराची स्थापना झाल्यानंतरचा असला पाहिजे. ग्रीक लोकांस Ionians हें नांव आहे. ग्रीक खलाशांचा व्यापार दक्षिणेंतील बंदरांपाशीं चालत असे. सहदेवाचा दिग्विजय लिहिणारी व्यक्ति उत्तर हिंदुस्थानांतील असावी. त्यानें रोम शहराचें नांव कर्णोपकर्णी ऐकलें व सहदेवाच्या दक्षिण–दिग्विजयांत घालून दिलें."

या एड्गर्टनच्या पत्रास मीं जें उत्तर दिलें त्याचा आशय असाः—" नुसत्या रोमा व यवनपुर या दोन शब्दांच्या आधारावर सभापर्वांतील दिग्विजय रोम शहर वसल्यावर इ. सनाच्या पहिल्या शतकांत लिहिले असें अनुमान काढणें म्हणजे वितर्कांची परमकोटि झाली. यवन शब्द Greek लोकांपासून रूढ झाला हा मूळ सिद्धांतच चुकीचा. Iwn अयोन हा शब्द Semetic देवतेचा वाचक आहे. Iraqमध्यें Akkad व Semetic वंशाचे लोक इ.सनापूर्वी ३००० वर्षांच्या आधींपासून असल्याची प्रसिद्धि आहे. नरकासुर व भगदत्त हे Iraqमधील Susa dynastyचे होते. कच्छच्या व खंबायतच्या आखातांतून गलबतानें Iraqकडे इमारती लांकूड वगैरे वस्तूंचा व्यापार ५००० वर्षांपूर्वी चालत होता असें Assyrian Cultureचे तज्ज्ञ संशोधक डॉ. Sayce यांनीं इंग्लंडमधील आपल्या Hibbert Lecturesमध्यें सिद्ध केलें आहे. महाभारतांत भगदत्तास ' यवनानां राजा ' म्हटलें तें तो ग्रीक होता म्हणून नव्हे. या अयोन लोकांची



अनुक्रमणिका








# सहदेव 'रोम'(इटली)ला गेला होता काय ?

वसाहत कच्छ व खंबायत यांचे आखातांत होती. नकुलाच्या पश्चिम-दिग्विजयांत ' अरणं चैव रोमं च यवनानां पुराणि च । ' अशीं यवनांचीं शहरें तो जिंकत गेला असल्याचा उल्लेख आहे. कच्छच्या उत्तरेस सांबर तलाव नांवाचें पंचवीस मैल घेर असलेलें एक मोठें तळें आहे. त्यास ' रूमा ' असें नांव पूर्वी होतें असा पुरावा मिळतो. त्याच्याजवळ असलेल्या गांवास रोम, रोमा अशीं नांवें असणें साहजिक आहे. यवनपुर म्हणजे Alxandria वगैरे काढलेलीं अनुमानें निराधार तर्कटीखालीं मोडतात."

वरील आशयाचें पत्र पाठवून तीन महिन्यांवर दिवस होऊन गेले आहेत. परंतु प्रो. एड्गर्टन यांचे-कडून त्याबाबत कांहींहि उत्तर वा खुलासा नाहीं. येथें या पत्रव्यवहाराचा आशय देण्यांत हेतु हा कीं, सभापर्वांतील वरील विधानाबाबत संशोधन होऊन सत्यान्वेषणास मदत व्हावी.

---

लहानपणीं आमचें शिक्षण सुरू झालें तेव्हांची मला आठवण आहे कीं, अ, आ, क, ख, आदि वर्ण शिकविण्यापूर्वीं विद्यार्थ्यांना ' श्रीगणेशाय नमः ', ' ॐ नमः सिद्धम् ' हें शिकविलें जाई. मी महाराष्ट्रांतील गोष्ट सांगत आहे. इथें कसें शिकविलें जातें तें मला ठाऊक नाहीं. त्यांत ' श्रीगणेशाय नमः ' हें शिष्यांच्या धर्माला अनुलक्षून ठेविलें आहे. कारण, हिंदु धर्मांत पहिला नमस्कार गणेशाला केला जातो. ' ॐ नमः सिद्धम् ' हें जैन धर्माला अनुलक्षून ठेविलें आहे. तो जैन गुरूंचा शिक्का आहे. परंतु जैन गुरू इतके नम्र होते कीं ' ॐ नमः सिद्धम् 'ला त्यांनीं ' श्रीगणेशाय नमः 'च्या नंतर स्थान दिलें. जैनांनीं आपल्यासाठीं स्वतंत्र अधिकारहि मागितले नाहींत. ते आपल्याला केवळ सुधारक मानीत होते. हीच त्यांची विशेषता.

—आचार्य **विनोबा**, महावीर-जयन्ती, २१।४।४८, दिल्ली. ' **सेवक** 'वरून.

पुस्तक-परीक्षण—

# साने गुरुजींचें 'चिंतनिका'

**श्री. गो. रा. दोडके.**

एकादा ग्रंथ आपल्याला आवडतो, तो आपल्या जिवाचा होतो, वेळोवेळीं त्याच्याकडे वळून बघावेंसें वाटतें, त्याच्या वाचनानें अंतःकरणांत निर्माण झालेली खळबळ शांत होऊन मनाला समाधान लाभतें, तें प्रसन्न होतें, त्याला आपण 'गीते'-प्रमाणें मानतों, भक्तिभावानें आपण त्याच्याकडे पाहतों : या सगळ्याला अनेक कारणें असूं शकतात. त्या अनेकांपैकीं एक हें असूं शकतें कीं, तो ग्रंथ व आपलें व्यक्तिगत जीवन यांचें पूर्ण तादात्म्य असूं शकतें. जे विचार, जे प्रसंग, जो दृष्टिकोन, ज्या समस्या, जें ध्येय, जी जीवनाची पातळी ग्रंथांत आढळतात, तींच वाचकाच्या व्यक्तिगत जीवनांत असूं शकतात. ग्रंथ व व्यक्तीचें जीवन यांच्यामध्यें साम्य, साधर्म्य असूं शकतें.

साने गुरुजी ॲमीलच्या दैनंदिनीच्या भाषांतराच्या चिंतनिके[१]च्या प्रस्तावनेंत लिहितात, "ॲमीलचें हें पुस्तक एके काळीं माझी जणूं गीता होती." 'गीता' कां होती, या प्रश्नाचें उत्तर चिंतनिका वाचून आपणांला मिळतें:—"जगांतील सर्व गोष्टी म्हणजे आपल्याजवळ ठेवलेली ठेव आहे, जणूं तें ऋण आहे. त्याच्या आसक्तींत आपण गुंतून जाऊं नये. वस्तुमात्राकडे आदरबुद्धीनें पाहणें, नीट समजून घेणें, जें वांट्यास येईल त्याचा स्वीकार करणें, भावनांचें संवर्धन करणें, जवळ असेल तें देणें, आपलें कर्तव्य करणें, हा माझा धर्म आहे. हा माझ्या जीवनाचा कायदा. ही माझी नीति. माझा स्वर्ग, माझें सुख यांत आहे." हे विचार, हीं वाक्यें मूळ ॲमीलचीं; पण साने गुरुजींच्या साहित्याशीं, जीवनाशीं ज्याचा परिचय आहे, तो हीं वाक्यें त्यांच्या लेखणींतून किती सहज रीतीनें येऊं शकतील याची कल्पना करूं शकतो. आपल्या जीवनाचें ध्येय म्हणून साने गुरुजी ॲमीलचीं "दुसऱ्यास सुख देणें, चांगलें करणें, हा एकच मंत्र, एकच नियम—जिवंत राहायचा हेतु येवढाच.—हा सेवाधर्म जोंपर्यंत अबाधित आहे तोंपर्यंत आपणांस ध्येय आहे आणि जीवन जगण्यालायक आहे. जीवनास किंमत आहे'—हीं वाक्यें जशींच्या तशीं सांगूं शकतात. गुरुजींना कोणीं म्हटलें, 'तुम्ही आपलीं आदेशवाक्यें बोलून दाखवा', तर ते म्हणतील, "चांगले राहा, शुद्ध राहा, सहनशील असा, मर्दाप्रमाणें वागा, श्रद्धा राखा व भक्ति ठेवा, निरहंकार असा व सर्वांवर दया आणि प्रेम करा."

तर याप्रमाणें साने गुरुजींना आपलें स्वतःचें आंतरिक, चिंतनात्मक जीवन, आपलें ध्येय, आपले विचार ॲमीलच्या चिंतनिकेंतून आढळतात, वाचतां वाचतां स्वतःचें जीवन त्यांना स्पष्ट दिसूं लागतें, मन विचारप्रवण होतें व कार्याला मार्ग मिळून जीवन

---

१ चिन्तनिका (खंड १ला)—ॲमील. अनुवादक—साने गुरुजी. पृष्ठें २५०. प्रकाशक—देशमुख आणि कंपनी, पुणें २. मूल्य ६॥ रु.








सार्थकीं लावण्याला मदत होते. म्हणूनच ते चिंतनिकेला ' गीता ' म्हणून संबोधतात.

ॲमीलच्या दैनंदिनीचें महत्त्व साने गुरुजींना जें वाटतें त्याचें हें एक कारण. पण याशिवाय 'चिंतनिके'चा कांहीं भाग असा आहे कीं तो इतरांनाहि आवडूं शकेल. ॲमीलची मूळ प्रवृत्ति नीतिपर व चिंतनात्मक. स्वतःच्या जीवनांत, भोंवतालच्या वातावरणांत, जगांत घडणाऱ्या गोष्टींविषयीं देखील तो लिहितो. त्याचें अंतःकरण कवीचें आहे. त्यामुळें सृष्टींत रोज होणाऱ्या स्थित्यंतराविषयीं तो लिहितो, त्याचीं सृष्टिवर्णनें अत्यंत सुंदर आहेत. पण हीं वर्णनें काव्याचे फवारे उडविण्याकरितां नाहींत. वर्णन झाल्यावर लगेच त्याच्या अंतःकरणांत तरंग उठतो, 'असें हें सरोवर मला कोणता बरें संदेश देत असेल !' ॲमीलच्या दैनंदिनीचा काळ १८४१ पासून १८८१पावेतोंचा. या काळांत फ्रान्समध्यें व सगळ्या युरोपमध्यें केवढ्या मोठाल्या उलाढाली झाल्या ! विशेषतः फ्रान्समध्यें, दुसऱ्या लोकसत्ताकाचा कारभार, लुई नेपोलिअनची कारकीर्द, फ्रँको–जर्मन युद्ध, या ऐतिहासिक घडामोडी झाल्या. ॲमील या घडामोडींचें वर्णन करीत नाहीं, कित्येकदां तर त्याचा नामनिर्देशहि करीत नाहीं; पण या घडामोडींना अनुसरून व्यक्तिस्वातंत्र्य, जर्मन लोक, त्यांचें जीवनविषयक तत्त्वज्ञान, त्यांतील वैगुण्य व वैशिष्ट्य यांविषयीं आपले विचार नमूद करतो. जगांतील तत्त्वज्ञानाच्या निरनिराळ्या शाखांचा अभ्यास त्यानें केला होता. त्यामुळें निरनिराळ्या धर्मांतील तत्त्वज्ञानांवर त्याचे विचार अनेकदां प्रकट झाले आहेत. भारतीय तत्त्वज्ञानहि त्याला अवगत आहे व ब्रह्म, माया, निर्वाण, भारतीय जीवनाची घडण, यांच्यावरहि दैनंदिनींत त्याचे विचार आहेत. युरोपांतील व फ्रान्समधील अनेक लेखकांविषयीं त्यानें आपलीं मतें लिहिलीं आहेत. विशेषतः रूसो, मॉंटेस्क्यू, टॉकव्हिल, गटे, व्हिक्टर ह्यूगो, जोबर्ट, यांच्यावरील विचारांना स्वतंत्र निबंधांचें स्वरूप प्राप्त झालें आहे. त्याच्या ग्रंथविषयक मतांमध्यें ग्राह्यांशहि बराच आहे. या प्रकारचें स्वरूप चिंतनिकेचें असल्यामुळें चिंतनिका केवळ चिंतनपर वृत्तीच्या वाचकांकरितांच आहे अशांतला भाग नाहीं. निरनिराळ्या प्रकारच्या लोकांकरितां तींत निरनिराळ्या गोष्टी आहेत व त्यामुळें चिंतनिका कशाहि प्रकारच्या वाचकाचें मन आकृष्ट करूं शकेल.

ॲमील जेनेव्हा–ॲकॅडेमीमध्यें प्रथम सौंदर्यशास्त्राचा व नंतर तत्त्वज्ञानाचा प्राध्यापक होता. जेनेव्हा येथेंच त्यानें आपला शिक्षणक्रम पूर्ण केला व नंतर कांहीं काळ त्यानें हायडलबर्ग व बर्लिन येथील विश्वविद्यालयामध्यें काढला. १८४९च्या सुमारास त्यानें जेनेव्हा–ॲकॅडेमीमध्यें प्रवेश केला व १८८१-मध्यें त्याचा मृत्यु होईपावेतों तो तेथेंच होता. त्याचें जीवन बरवर अगदीं शांत व संथ होतें. राजकीय, सामाजिक वा साहित्यिक घडामोडींमध्यें त्यानें प्रत्यक्ष असा भाग घेतल्याचें त्याच्या दैनंदिनीवरून आढळून येत नाहीं. पण त्याचें मानसिक जीवन मात्र अत्यंत खळबळीचें होतें. त्याच्या अंतःकरणांत जीवनाविषयीं व स्वतःविषयीं अविश्वास होता. हा अविश्वास म्हणजे एक रोग आहे याची त्याला जाणीव होती व तो रोग नाहींसा व्हावा या दृष्टीनें त्याचे प्रयत्न सदैव चाललेले असत. आपण आहों त्यापेक्षां जास्त उन्नत व्हावें, ज्या उणीवा आपल्या ठिकाणीं आहेत, जीं किल्मिषें मनांत आहेत, तीं नाहींशीं व्हावीं, तें पापरहित व्हावें, शुद्ध व्हावें, निर्मळ व्हावें ही त्याची मनीषा असल्यामुळें आत्मचिंतनाची, आत्मपरीक्षणाची आवश्यकता. व हें तो करतो दैनंदिनीच्या योगानें. दैनंदिनी जीवनध्येय साध्य करण्याचा एक मार्ग. दैनंदिनी त्याच्या मनांतील खळबळ शांत करते व आत्म्याच्या राज्यांत त्याला प्रवेश मिळवून देते. तिच्याच योगानें तो सत्यशोधनाचा प्रयत्न करतो. तो लिहितो, " एक गोष्ट मात्र येथें ( दैनंदिनींत ) सदैव आढळेल. ती म्हणजे सत्य होय. माझ्या विचारांची आदिदेवता सत्यच आहे. सत्यशोधन हेंच या विचारांचें इतिकर्तव्य. या लिहिण्यांतील हाच हेतु. या चिंतनिकेचें हेंच प्रास्तव्य. " तुकाराममहाराज एका अभंगांत म्हणतात, ' आपलाचि वाद आपणासी'. किंवा कुसुमाग्रज म्हणतात, 'हृदयाचे बोल इथें बोलतसे हृदयासी'. यांतलीच ही चिंतनिका. ॲमील आपल्या मानसिक जीवनाविषयींच प्रामुख्यानें लिहितो. रोजच्या सामान्य जीवनाला त्यानें संक्षेप दिलेला










आढळून येतो. परंतु ज्या वेळीं तो भावनेनें आपल्या शाळीविषयीं, फॅनी मर्सिएच्या घरच्या पियानोविषयीं वा मांजराविषयीं लिहितो, त्या वेळेला त्याच्या लेखणींत अपरिमित गोडवा, नाजूकपणा, काव्य निर्माण होतें. या उताऱ्यांमध्यें ललित निबंधाचे सर्व गुण आढळून येतात. अंतःकरणांत कायमचे राहतील असे हे भाग आहेत.

परंतु साने गुरुजींच्या 'चिंतनिके'ची ठेवण अशी आहे कीं, ॲमीलचें व्यक्तिरूप त्यांतून फार थोडें दिसावें. ॲमीलच्या दैनंदिनीचीं चाळीस वर्षांमध्यें जवळजवळ १६००० पृष्ठें झालीं. व्यक्तीपेक्षां तिच्या विचारांना महत्त्व जास्त असें मानून फ्रेंच आवृत्तीच्या संपादकांनीं वैयक्तिक उल्लेखाचे फारच थोडे उतारे त्याच्या दैनंदिनींत येऊं दिले. येवढ्या मोठ्या लेखन-संभारांतून केवळ आठएकशें पृष्ठांचाच मजकूर निवडला; ॲमीलच्या व्यक्तिमत्त्वाला उणेपणा येईल असा भाग, असे शब्द, स्त्रीविषयक विचार, दैनंदिनींतून लोकांच्या नजरेला येणार नाहींत अशी खबरदारी घेतली. साने गुरुजींनीं तर त्याचेंहि मंथन करून 'चिंतनिका' तयार केली. 'चिंतनिके'ला प्रस्तावना नाहीं. त्यामुळें 'चिंतनिका' वाचून ॲमील कोण याविषयीं कुतूहल राहतेंच. साने गुरुजी देखील पहिल्या आवृत्तीच्या फ्रेंच संपादकांप्रमाणें ॲमील या व्यक्तीला महत्त्व देत नाहींत. याचा परिणाम असा झाला आहे कीं, 'चिंतनिका' 'मनाच्या श्लोकां'ची किंवा 'शुभ वर्तमाना'ची बहीण वाटते. या विधानाला बाध आणणारे उतारे नाहींत असें नाहीं, पण ते थोडे आहेत. साने गुरुजींनीं उताऱ्यांवर तारखा दिलेल्या नाहींत. जेनेव्हा सोडून तो दुसऱ्या ठिकाणीं जातो तिथली दैनंदिनी असेल तर तिच्यावर स्थळाचा उल्लेख नाहीं. ज्या फॅनी मर्सिएच्या स्वाधीन आपल्या मृत्यूनंतर 'जर्नल' केलें जावें असें ॲमीलनें आपल्या मृत्युपत्रांत लिहून ठेवलें, तिच्या उल्लेखाचा एकादाच उतारा आहे. स्पष्टीकरणार्थ टीपा नाहींत. उताऱ्यांवर काळाचा उल्लेख असता तर साधारणपणें कोणत्या ऐतिहासिक घडामोडींना अनुलक्षून तो विचार प्रकट करतो हें कळूं शकलें असतें व त्याच्या विचारांची ऐतिहासिक पार्श्वभूमि कळून तो फ्रेंच व जर्मन लोकांविषयीं आणि लोकसत्ताकाविषयीं कित्येकदां अनुदार (पण अर्थपूर्ण) उद्गार कां काढतो हें कळूं शकलें असतें. पण पुस्तकाची रचना 'ॲमील' मराठींत यावा अशी नाहीं, तर ॲमीलच्या चिंतनिकेंतून साने गुरुजी दिसावे अशी आहे. हा प्रकार दोषास्पदच आहे असें मी म्हणणार नाहीं. म्हणेन येवढेंच कीं ॲमीलच्या नांवाचें कुंकू 'चिंतनिके'ला लागलें नसतें तर तें जास्त समर्पक झालें असतें.

यानंतर भाषांतराच्या भाषेविषयीं. भाषा अति वाईट आहे. सफाईचा हात जर त्याच्यावर फिरला असता तर बऱ्याचश्या चुका निघून गेल्या असत्या. पण भाषांतरकर्त्याला याची आवश्यकता बहुधा वाटली नसावी. याचा परिणाम असा झाला आहे कीं पहिल्याच पानावर "ईश्वराची पूजा करण्याचे, त्याची चव घेण्याचे हे सगळे प्रकार आहेत" असें वाक्य वाचायचें वाचकांच्या नशिबीं येतें ! "त्याच्या चुकीच्या भुलीचा परिणाम आहे" असेंहि गबाळ वाक्य आढळतें." त्याची बुद्धि सर्व विषयांजवळ जाते"," थेंबें थेंबें सांचणारें दुःख","आंतरिक जीवनाच्या या ज्या गूढ हालचाली त्या सर्व एका क्षणांत पुंजीभूत होतात" या प्रकारच्या शब्दांच्या योगानें हवा तो भाव निर्माण न होतां भलताच निर्माण होतो. वाचतां वाचतां अशीं वाक्यें सारखीं दिसून येतात. वाक्यरचनेमधील विस्कळितपणा व निरर्थकता पदोपदीं खटकतात. मुद्रकांनींहि शुद्धाशुद्धाची काळजी घेतलेली नाहीं. सव्वादोनशें—अडीचशें पृष्ठांचें पुस्तक व त्याला आठनऊ पृष्ठांचें शुद्धिपत्र ! एक उतारा तर दोनदां छापला गेला आहे ! साने गुरुजींची वाईट भाषांतर करण्याबाबत व पुस्तकाच्या मुद्रकांची पुस्तक वाईट छापण्याबाबत अहमहमिका लागली होती कीं काय, देव जाणे !

आणि या सगळ्या प्रकाराची किंमत आहे साडेसहा रुपये !

हा तर चिंतनिकेचा पहिलाच भाग. अजून चिंतनिकेचा दुसरा भाग प्रसिद्ध व्हावयाचा आहे. अपूर्ण चित्रावर टीका करणाऱ्या, मत देणाऱ्या व्यक्तीला दोष दिला जातो. पण चिंतनिकेचें जें रूप पहिल्या भागानें आपल्यापुढें आलेलें आहे तें मोहक नाहीं, विश्वास निर्माण करणारें नाहीं. साने गुरुजी



[ पृष्ठ ८२ वर पहा ]





# सार–संकलन

## ' लोकसत्तावाद्याची श्रद्धा '

नागरिक–शिक्षण–संघाचे (Association of Education in Citizenshipचे) अध्यक्ष सर अर्नेस्ट सायमन यांनीं (The Faith of a Democrat) ' लोकसत्तावाद्याची श्रद्धा ' या नांवाचा एक निबंध लिहिला आहे. ह्या निबंधाचा उद्देश इंग्लंडांतील तीन प्रमुख राजकीय पक्षांच्या मूलतत्त्वांतील साम्य दाखवून, तीं मूलतत्त्वें हुकूमशाहीपासून किती भिन्न आहेत हें सांगण्याचा होता. हुजूर (Conservative) पक्ष आणि उदार (Liberal) पक्ष या पक्षांच्या पुढाऱ्यांना हा निबंध मान्य असून, मजूर पक्षातर्फे मेजर ॲट्ली यांनीं त्याला मान्यता देतांना एक अपवाद ठेवला आहे. ते म्हणतात, "हा खर्डा मजूरपक्षाच्या सभासदांस सामान्यपणें मान्य होण्यासारखा आहे. तथापि एक महत्त्वाचा अपवाद नमूद करणें जरूर आहे. आम्हांला 'आर्थिक प्रतिनिधित्व' या भागाला मान्यता देतां येत नाहीं. कारण खऱ्या लोकसत्तेला आर्थिक समानतेची गरज आहे असें आम्ही समजतों." त्या निबंधांतील ('The Individual') ' व्यक्ति ' या प्रकरणाचा सारांश खालीं दिला आहे:—

"लोकसत्ता म्हणजे आपण काय समजतों ? लोकसत्तावादी आणि अधिकारवादी किंवा हुकूमशाहीवादी राष्ट्रांच्या नागरिकांच्या श्रद्धेमध्यें काय फरक आहे ?

"आजच्या राजकीय जगतांत विचारांचा मोठा संघर्ष आहे. आणि तो संघर्ष दोन परस्परविरुद्ध तत्त्वज्ञानांतून निर्माण झाला आहे. पहिलें तत्त्वज्ञान अधिकारवाद्यांचें किंवा हुकूमशाहीवाद्यांचें आहे. त्यांचें म्हणणें असें आहे कीं व्यक्तीचें अस्तित्व राष्ट्राच्या सत्तेसाठीं आणि वैभवासाठीं असून हुकूमशहाच्या सेवेंतच व्यक्तीची इतिकर्तव्यता आहे. व्यक्तीचे सर्वोत्तम सद्गुण म्हणजे शिस्त, आज्ञाधारकपणा, धैर्य आणि स्वार्थत्याग हे होत. दुसरें तत्त्वज्ञान लोकसत्तावाद्यांचें आहे; ते समाजाचा एक घटक म्हणून व्यक्तीस स्वतःचें व्यक्तिमत्त्व आठवायला मदत करण्याकरितां राष्ट्राचें अस्तित्व आहे असें समजतात.

" हुकूमशहाचें तत्त्वज्ञान साधें आहे. हिटलरच्या विलक्षण प्रकारच्या विजयानें आपणांस हें दाखवून दिलें आहे कीं, अविरत प्रचाराच्या जोरावर (massesना) सामान्य जनसमूहाला दोनतीन वर्षांच्या अवधींत आपल्या मार्गानें—आणि तेंहि मनः–पूर्वकतेनें—नेण्याला तयार करणें हुकूमशहाला शक्य आहे. लोकसत्तावाद्यांना त्यांत जर कांहीं अत्यंत भीतिप्रद वाटत असेल तर तें हें कीं हिटलरनें जगांतील सर्वांत अधिक शिक्षित अशा लोकांमध्यें हें शक्य करून दाखविलें.

" लोकसत्तावाद्यांच्या तत्त्वज्ञानाची व्याख्या करणें फार कठिण आहे. पूर्वी सामान्यपणें जुलूम आणि अन्याय ह्यांविरुद्ध बंड करूनच लोकसत्ताक राज्यें निर्माण झालीं. त्या लोकसत्ता निर्माण करणारांचें उद्दिष्ट न्याय आणि स्वातंत्र्य मिळविणें आणि जीवनांतील चांगल्या गोष्टींचा (share of the good things of life) अधिक भाग संपादन करणें हें होतें. लोकसत्ता ज्यांनीं शोधून काढली (invented), त्या








ग्रीक लोकांच्या काळापासून लोकशाहीची व्याख्या ती राज्यकारभाराचें केवळ एक तंत्र (form) आहे येवढीच केली जात नाहीं, तर ती जीवनाचा एक मार्ग आहे अशी करण्यांत येते. इतिहासांतील एक थोर लोकसत्तावादी नेता पेरिक्लीज (Pericles) एका प्रेतयात्रा–प्रसंगाच्या वक्तव्यांत म्हणतो, 'आमच्या राज्यघटनेला लोकसत्ता म्हणतात, ह्याचें कारण ती फार थोड्यांच्या हातांत नसून तिच्यांत सर्वांचाच हात आहे.' तो पुढें म्हणतो, 'आमचे कायदे सर्वांना त्यांच्या खासगी भांडणांमध्यें समान न्याय देतात. आमच्या शेजाऱ्यानें जर त्याच्या इच्छेप्रमाणें मौज मारली, तर त्याच्याकडे पाहतांना मुद्रा क्रुद्ध करून आम्हीं डोळे वटारणार नाहीं, किंवा त्याला रागीट शब्दहि आम्हीं ऐकवणार नाहीं.' ती पुष्कळांची सत्ता आहे आणि तिचें उद्दिष्ट स्वातंत्र्य, न्याय आणि सहिष्णुता हें आहे हें आपल्या व्याख्येंत पेरिक्लीजनें स्पष्ट केलें आहे.

"फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळीं लोकांच्या मागण्या 'स्वातंत्र्य, समत्व आणि बंधुत्व' ह्या घोषणां-(slogans)मध्यें एकवटल्या होत्या. अमेरिकेच्या स्वातंत्र्याच्या घोषणे( Declaration of Independence)मध्यें सर्व माणसें जन्मानें स्वतंत्र आणि समान आहेत व प्रत्येकाला 'जीवन आणि स्वातंत्र्य यांच्या उपभोगाचा आणि सुखाचा शोध करण्याचा' जन्मसिद्ध हक्क आहे ह्यावर भर दिला आहे. रशियाच्या नवीन घटनेंत—जी घटना कागदावर तरी नक्कीच लोकसत्तावादी आहे,—निदान त्या घटनेंतील ध्येयाच्या बाबतींत तरी, जीवनाच्या भौतिक गोष्टींवर आणि कामाचा हक्क, स्वास्थ्य आणि विश्रांति यांवर भर दिलेला आहे. त्यानंतर तिच्यांत शिक्षणाच्या हक्कावर जोर दिला आहे; आणि शेवटीं सभा–स्वातंत्र्य आणि भाषण–स्वातंत्र्य ह्यांना प्राधान्य दिलें आहे. आणि हें सर्व 'समाजवादी राज्य स्थिर करण्यासाठीं' केलेलें आहे.

"इंग्लंडांत लोकसत्तेची वाढ हळूहळू झाली आहे. फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळीं बुद्धिवादाच्या काळांत वातावरण घोषवाक्यांनीं भरलेलें (seethed with formulas) होतें. इंग्लंडांत स्पष्टपणानें प्रतीत होणारीं गाऱ्हाणीं दूर करण्याच्या मागणीवरच, साधारणतः लोक–सत्ता स्थापन करण्याची लोकांची मागणी आधारलेली आहे. (In England the urge for populur power has in general been based on the demand for the redress of concrete grievances.) प्राचीन ग्रीक लोकशाहीपेक्षां अर्वाचीन लोकसत्ता बरीच निराळी आहे; परंतु तिचें सार पाहतां पेरिक्लीजचे शब्द अद्यापहि खरेच आहेत. लोकशाही हें अनेकांचें राज्य आहे आणि सर्व लोकांचें स्वातंत्र्य व न्याय हा तिचा हेतु आहे. फक्त तिची शब्दरचना बदलते; पण तिचें अंतर्गत ध्येय कायमच आहे. जे लोकसत्तेची मागणी करितात, त्यांच्याकरितां अधिक चांगलें जीवन हेंच तें ध्येय आहे. लोकसत्तेची मागणी करणारांमध्यें सगळेच लोक येत नाहींत. ॲथेन्समध्यें फक्त स्वतंत्र नागरिकांकरितांच लोकसत्ता होती. इंग्लंडमध्यें सरदार–जहागिरदारां-(barons)पासून लोकसत्ता सुरू झाली; पण पुढें हळूहळू सर्वसाधारण जनतेचाहि तिच्यांत अंतर्भाव झाला. लोकसत्तेच्या मागणीमध्यें साधारणपणें निरनिराळ्या गोष्टी येतात. राजकीय दृष्ट्या स्वातंत्र्य व न्याय आणि आर्थिक दृष्ट्या सर्वसामान्य लोकांकरितां भौतिक गरजांची पूर्ति. कधीं कधीं राजकीय दृष्टिकोना-(Aspect)वर भर दिला जातो. उदाहरणार्थ, फ्रेंच राज्यक्रांतींत व आजच्या आयर्लंडांत. ज्याला तेथील लोक ब्रिटिशांचा जुलूम असें अद्यापि देखील समजतात, अशा जुलुमाविरुद्ध अतिशय तीव्र असंतोष आयर्लंडांत आहे. लोकसत्तेच्या मागणीचा भर कधींकधीं भौतिक बाबींवरहि असतो. उदाहरणार्थ, रशियाच्या घटनेंत आणि इंग्लंडमध्यें. तेथें सामान्य मनुष्याचें राजकीय स्वातंत्र्याकडे फारसें लक्ष नाहीं; तें त्याला मिळतच आहे. अधिक चांगली राहणी, अधिक विश्रांति आणि अधिक सुरक्षितता यांची मागणी तेथें आहे.

"हे सर्व उद्देश लक्षांत घेऊन लोकांनीं राजकीय सत्ता कोणत्याहि विशिष्ट अंमलदारवर्गा(Governing Class)च्या किंवा एकट्या व्यक्तीच्या हातांत न ठेवतां सर्वसाधारण लोकांच्या हातांत ठेवावी अशी मागणी केली आहे. हुकूमशहाच्या किंवा विशिष्ट निवडक गटाच्या (Oligarchs) हातांत सत्ता देऊन आणि त्यांच्यावर

विश्वास ठेवून सगळ्या लोकांचें हित कधींच साधणार नाहीं. सर्व लोकांचें हित साधावयाचें असेल तर लोकांनीं स्वतःच राज्यसूत्रें संभाळावयाचा निश्चय केला पाहिजे आणि आपणच राज्यकारभार अधिक चांगला करूं शकूं अशी त्यांची खात्री असली पाहिजे, असें कटु अनुभवानें लोकांस शिकविलें आहे. सर्वसाधारण माणसांच्या ठायीं राज्यकारभार करावयास लागणारें व्यवहारज्ञान आणि चांगुलपणा असतात अशी लोकसत्तावाद्यांची मूलभूत श्रद्धा असते. आणि माणसांना स्वातंत्र्य व अधिकार दिल्यास तीं एकमेकांस शिक्षण देतील, एकमेकांचें सहकार्य संपादन करण्याची संवय व परंपरा निर्माण करतील आणि दीर्घ काळानंतर सगळ्यांनाच चांगलें जीवन जगण्याची सर्वोत उत्कृष्ट संधि प्राप्त होईल अशी समाजाची घडी बसवितील असा लोकसत्तावाद्यांना भरंवसा आहे. लोकसत्तावादी मनुष्य आशावादी असतो. त्याचा सर्वसामान्य माणसाच्या सुस्वभावावर, चांगुलपणावर व राजकीय कर्तृत्व–शक्तीवर विश्वास असतो.''

## प्रयत्नें वाळूचे कण रगडितां—

प्रयत्नवादाचा थोरपणा सिद्ध करण्यास 'प्रयत्नें वाळूचे कण रगडितां तेलहि गळे' या उक्तीचा उपयोग करतात. प्रयत्नान्तीं परमेश्वर सुद्धां पावतो असा आपल्याकडील समज आहे. आजची परमाणुस्फोटापर्यंतची प्रगति म्हणजे प्रयत्नवादाचा मोठाच विजय आहे. 'प्रयत्नवाद हा यशाचा पाया आहे' हें तत्त्व उराशीं धरूनच शास्त्रज्ञ संशोधन करीत असल्यामुळें तो अदृश्यांतून दृश्य आणि अस्पष्टांतून स्पष्ट निर्माण करूं शकला आहे. अणुलहरी–एककाच्या (Micro-wave-unitच्या) साहाय्यानें दृष्टीआड सृष्टि राहिली नाहीं. अदृश्य हवा शास्त्रीय प्रयोगानें दृश्य केली. अशा प्रयोगांच्या धूमधडाक्यांत, वाळू कितीहि कणखर असली तरी काय टिकाव धरणार ? संशोधनपूर्तीसाठीं लोखंडाचे चणे खाण्यास तयार असणाऱ्या शास्त्रज्ञांपुढें वाळूनेंहि हार खाल्ली आणि मानवसेवेसाठीं सुगंधादि स्वरूपांत ती पुढें येऊं पाहत आहे.

कॉर्नेल–विश्वविद्यालयांतील दोन शास्त्रज्ञांनीं अमेरिकन केमिकल सोसायटीस सैकता( Silicon )-पासून तयार होऊं शकणाऱ्या नव्या संयोगांबद्दल माहिती दिली आहे. वाळूंतील प्रमुख तत्त्व जें सैकता ( Silicon ) त्याच्यापासून रासायनिक विधींनीं नवीं आणि महत्त्वाचीं सुवासिक आणि सुगंधी द्रव्यें, अत्तरें, तद्वतच नयनमनोहर रंग तयार करतां येतील असें त्या शास्त्रज्ञांचें म्हणणें आहे.

प्राथमिक संशोधनकार्यानें असा अंदाज आला आहे कीं सुगंध, सुवास, रुचि आणि रंग यांस कारणीभूत असलेल्या प्रांगाराच्या ( Carbon ) सौरभिक ( Aromatic ) संयोगांशीं पुष्कळ अंशीं सदृश असे सैकता या तत्त्वाचे बहुविध संयोग तयार करतां येतील. Aroma म्ह. सुगंध, सौरभ. यावरूनच सुगंध असलेल्या ( Carbon–Compoundsना ) प्रांगार–संयोगांना '( Aromatic ) सौरभिक' अशी संज्ञा देण्यांत आली आहे.

कॉर्नेल–शास्त्रज्ञ प्राचार्य ई. एच्. वेलर आणि एस्.एच. बॉवर यांनीं प्रांगाराच्या धूपेन्य(Benzene)-वलयाशीं ( Ringशीं) पुष्कळ अंशीं सदृश असलेल्या सैकतावलयाची (Silicon ringची ) मोजमापणी केली आहे. सौरभिक संयोगांचा (Aromatic Compoundsचा ) पाया म्हणजे धूपेन्य–वलय (Benzene ring) हाच होय. धूपेन्य–वलयांत सहा प्रांगार–परमाणू (Carbon atoms) एकाशीं एक असे संलग्न होऊन एक वलयाकार रचना पूर्ण करतात. ही रचना अत्यंत स्थिर (Stable) अशी असते. अशी रचना सुगंधित द्रव्यें, सुरुचि द्रव्यें, रंग इत्यादि पदार्थांचे व्यूहाणू तपासल्यास हटकून सांपडतेच. उदाहरणार्थ, नुकताच निघालेला एक गोड पदार्थ आपण घेऊं. त्याचें रासायनिक नांव n-propoxy-2-amino-4-nitro-benzene असें आहे. हा साखरेच्या चारहजारपट गोड आहे. हा संयोग धूपेन्या(Benzene)पासून झाला आहे. रंगांविषयीं पाहिलें तर बरेचसे रंग विनीली (Aniline)-पासून तयार झाले आहेत. वरील मूळ पदार्थ धूपेन्यापासूनच झाला आहे. म्हणूनच धूपेन्यवलय ( Benzene ring ) हा सौरभिक संयोगाचा पाया मानतात. सैकताचे ( Siliconचे ) परमाणू पुष्कळ अंशीं प्रांगार–परमाणूंशीं सदृश आहेत. ९२ तत्त्वें विशिष्ट तऱ्हेनें गुणधर्मांचा विचार करून मांडलीं








आहेत व त्या मांडणीला आवर्तन–सारणी (Periodic Table) असें नांव दिलें आहे. सैकता हें तत्त्व उपरिनिर्दिष्ट आवर्तनसारणींत पाहिलें असतां प्रांगाराच्या वर्गांतलेंच आहे असें दिसून येईल. ह्या सैकता–तत्त्वाचे परमाणू जारकाची (Oxygenची) मदत घेऊन धूपेन्य( Benzene )–सदृश संयोग तयार करतात.

यापूर्वीच सैकता (Silicon) या तत्त्वानें प्रांगारा-( Carbon )शीं स्पर्धा करून सैकता–शृंखला–संयोग ( Silicon chain compounds ) तयार केले आहेत. त्याचा उपयोग जलसुरक्षितबाष्प ( Waterproof vapour ), यंत्रांतील घर्षण कमी करणारीं तरलें ( Lubricant liquids) आणि उल्लेखनीय गुणधर्म असलेले सान्द्र ( Solid ) पदार्थ तयार करण्याकडे होतो. आतां तर वरील घटनेनुसार सैकता-( Silicon )पासून वलय–संयोग ( Ring-Compounds) तयार होऊं पाहत आहेत. भविष्यकाळाविषयीं आशादायक अशी रासायनिक प्रगति दाखविणारें सैकता ( Silicon ) हें नवेंच तत्त्व प्रांगाराशीं स्पर्धा करण्यास उभें राहिलें आहे.

शास्त्रज्ञांनीं ' प्रयत्नें वाळूचे कण रगडून अत्तेंरे काढण्या 'चा बांधलेला चंग यशस्वी होऊं पाहत आहे, यांतच प्रयत्नवादाचें खरें यश आहे.

—श्री. भालचंद्र केळकर, M.Sc.,B.A. (Hons.)

---

## साने गुरुजींचें ' चिंतनिका '

[ पृष्ठ ७८ वरून ]

पुढच्या भागाला प्रस्तावना लिहिणार असून पहिल्या भागांतील एक उणीव नाहींशी करणार आहेत. पण नाहींशा व्हाव्या अशा अनेक उणिवा पुस्तकांत आहेत, ही जाणीव लेखक, मुद्रक, प्रकाशक वगैरे मंडळींना व्हावी येवढ्याचकरितां ह्या आगंतुक टीकेचें प्रयोजन.

---



अनुक्रमणिका

# औद्योगिक-वृत्त-विशेष

( पॅरामाऊंट पब्लिसिटी सिंडिकेट, लि., मार्फत )

**दि अलाइड भारत कन्स्ट्रक्शन कं. लि.** (कराड) ही १५ लक्ष रु. अधिकृत भांडवलाची कंपनी मोठमोठ्या इमारतींचीं बांधकामें करण्याकरतां स्थापन झाली आहे. कोयना-व्हॅली धरणाची चाळीस कोट रु.ची योजना सरकारनें हातीं घेतली असल्यामुळें या कंपनीला विस्तृत कार्यक्षेत्र मिळालें आहे.

**दि वेस्टर्न इंडिया एनॅमल कं., लि.**ने नीरा स्टेशनजवळ फॅक्टरी उभारून मालाचें उत्पादन सुरू केलें आहे.

**मे. पांडुरंग ॲग्रिकल्चरल प्रॉडक्ट्स्, लि.** (कुरोली, व्हाया कुर्डुवाडी) ही कंपनी शुभ्र दाणेदार खांडसारी साखर करण्याची आधुनिक मशिनरी आणीत असून येत्या मोसमांत अशी साखर ती काढूं लागेल. वाढत्या धंद्याच्या व्यापामुळें कंपनीनें आणखी पांच लक्ष रुपयांचें भांडवल विक्रीस काढलें आहे.

पूर्व पंजाबांतील जलंदर हें शहर पाकिस्तानांत गेलेल्या सियालकोटप्रमाणेंच **क्रीडा-सामग्रीच्या उत्पादनाचें केंद्र** होईल असें दिसतें. सियालकोट येथें सुमारें २५००० लोकांचें जीवन या धंद्यावर चाले, ते आतां बेकार झाले आहेत. आतां जलंदर येथें यांपैकीं बरेच कारागीर आलेले असून हॉकी, फूटबॉल, पिंगपाँग, बॅडमिंटन वगैरे खेळांचें साहित्य तेथें होऊं लागलें आहे.

**जयशंकर ऑइल मिल्स, लि.** (करमाळें जि. सोलापूर) ही पांच लाखांची खासगी कंपनी तेलाचा धंदा करण्यासाठीं निघाली असून श्री. आर. आर. डाळवाले हे कंपनीचे पहिले डायरेक्टर आहेत.

**हिन्द एजन्ट्स्, लि.** (१५, ड्यूगल रोड, बॅलार्ड इस्टेट, मुंबई) ही १० लक्ष रु. अधिकृत भांडवलाची खाजगी कंपनी मॅनेजिंग एजन्सीचा धंदा करण्यासाठीं स्थापन झाली असून श्री. राधाकृष्ण मोरे तिचे पहिले डायरेक्टर आहेत.

**स्टेनलेस स्टील एजन्सीज्, लि.** (मुंबई नं. ४) या कंपनीचीं संसारोपयोगी भांडीं स्पेशल अमेरिकन स्टीलचीं असून त्यांचे सुबक घाट व त्यांचें अप्रतिम पॉलिश यांमुळें अनेक कारखान्यांच्या मालांत तीं उठून दिसतात असें कंपनी प्रतिपादन करते. मे. मावळंकर ब्रदर्स लि. चे मॅनेजिंग डायरेक्टर श्री. अ. बा. मावळंकर याहि कंपनीचे मुख्य चालक आहेत.

वीज-पुरवठ्याचीं कंत्राटें घेण्यासाठीं **दि गोकाक इलेक्ट्रिक कं., लि.** (गोकाक) ही पांच लक्ष रु. भांडवलाची खाजगी कंपनी नोंदली गेली. श्री. जी. व्ही. महाजन हे कंपनीचे पहिले डायरेक्टर आहेत.

**युवर ओन प्रॉव्हिडन्ट इन्शुअरन्स कंपनी, लि.**ला (वेस्टर्न इंडिया हाऊस, मुंबई १) गत वर्षीं साडेचार लाखांहून अधिक काम आलें व साडेतीन लाखांचें काम तिनें पूर्ण केलें. महाराष्ट्रांतल्या सर्व प्रॉव्हिडन्ट कंपन्यांत पहिल्या दर्जाचा लौकिक कंपनीनें कायम राखला. अतिशय कडक पद्धतीनें पहिलेंच मूल्यमापन करूनहि नफा झालेल्या ज्या दोनचार कंपन्या आहेत त्यांपैकीं "युवर ओन" ही अग्रेसर कंपनी आहे.

बँक ऑफ महाराष्ट्र, लि.च्या सबसिडिअरी








कंपनीचें नांव 'महाराष्ट्र बँक एक्झिक्यूटर ॲन्ड ट्रस्टी कंपनी लि.,' असें होतें तें कांहीं तांत्रिक कारणांकरितां आतां '**महाराष्ट्र एक्झिक्यूटर ॲन्ड ट्रस्टी कं., लि.**' (लक्ष्मीरोड, पुणें २) असें करण्यांत आलें आहे. ट्रस्टी एक्झिक्यूटरचीं कामें प्रतिष्ठित कंपनीद्वयास सोंपविण्याची प्रवृत्ति वाढत असून प्रस्तुत कंपनी यासंबंधीं हरएक मदत करीत असते.

**युनायटेड सिल्क मिल्स्**, लि.(३१९, हॉर्न्बी रोड, मुंबई) ही ५ लाख रु. भांडवलाची खाजगी कंपनी रेशमी मालाचे उत्पादन करण्यासाठीं अस्तित्वांत आली असून श्री. आर. एफ्. पाटील हे तिचे पहिले डायरेक्टर आहेत.

**दि महाराष्ट्र ग्रंथ भांडार**, लि. (मुंबई नं. ४) या संस्थेनें पहिल्या वर्षीं लाख रु.वर उलाढाल करून सहा हजार रु. निव्वळ नफा मिळविला. व तो ६ टक्क्यांप्रमाणें भागीदारांना वाटला.

**पॅरेमाउन्ट पब्लिसिटी सिंडिकेट** लि.(४८१, शनवार, पुणें २) हिनें पहिल्याच वर्षी सुमारें ५०,००० रु.चें जाहिरातींचें काम केलें. शंभरांपर्यंत नियतकालिकांना कंपनीनें जाहिराती पुरविल्या.

दिल्लींत **व्यापारी विद्यापीठाची** स्थापना झाली असून श्री. रामेश्वरी नेहरू त्याच्या पहिल्या चॅन्सेलर आहेत.

सध्यां हिंदुस्थानांत सुमारें २२०० चित्रपटगृहें असून त्यांपैकीं सुमारें २००० चित्रपटगृहें देशी चित्रपट दाखवितात. वीस वर्षांपूर्वीं चित्रपटगृहांची संख्या सुमारें ३५० होती व त्यांतून बहुतेक परदेशी चित्रपटांना वाव मिळे.

**दि डेक्कन हॉटेल्स ॲंड जनरल इंडस्ट्रीज लि.** (१०२८, रविवार, पुणें २) या कंपनीची पुनर्घटना झाली असून नव्या संचालक मंडळाचे श्री. काकासाहेब तांबे हे अध्यक्ष आहेत. हॉटेलच्या धंद्याच्या सोयीसाठीं स्थापन झालेल्या या कंपनीनें वाढत्या व्यापासाठीं भांडवल वाढविण्याचें ठरविलें आहे.

अमेरिकेनें नित्योपयोगी वस्तू स्टॉल मशिन्सच्या द्वारा देण्यांत उच्चांक गांठला आहे. सोडा, कॉफीचा कप, जेवण, पायमोजे, शर्ट वगैरे कपडे, पेट्रोल वगैरे इष्ट वस्तू आवश्यक नाणीं टाकतांच मशीनमधून गिऱ्हाइकांस मिळतात. वृत्तपत्रें, टाइमटेबलें वगैरे वस्तूहि यंत्रें देतातच, पण वाचकांच्या अभिरुचीप्रमाणें योग्य तीं वाचनीय वर्गीकृत पुस्तकेंहि या यंत्रांतून मिळण्याची सोय झाली आहे. ला गार्डिया येथील विमानतळावर एक मशीन आहे त्यांत सव्वा शिलिंग टाकतांच ख्यात विमा-कंपनीची १२५० पौंडांची विमापॉलिसी विमेदारास मिळूं शकते. अशा यंत्रांतून गत वर्षी अमेरिकेंत अडीच कोटी पौंड किंमतीच्या मालाचा खप झाला.

———















अनुक्रमणिका






नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

# ‘नवभारता’ चें स्वागत

“ वाङ्मयीन दर्जा व विषयांचें वैविध्य हीं इतर बऱ्याच सद्य:कालीन मासिकांत न आढळणारीं वैशिष्ट्यें प्रामुख्यानें डोळ्यांत भरतात. ध्येयवादित्व शंकररावजी, जावडेकर व भागवत या नांवांशीं निगडितच आहे, तेव्हां त्यांचा उल्लेख करण्याची आवश्यकता नाहीं. ”

—ना. बा. गं. खेर, मुंबई ( १६ १०-४७ )

“ थोर उद्दिष्टाला साजेशी कामगिरी सतत करीत राहण्यास समर्थ अशी संपादक मंडळी ‘नवभारता’ स लाभलेली आहे....... नामवंत विद्वान् लेखकांचें साहाय्य म्हणजे नवभारताच्या यशाची एक प्रकारची हमीच होय. ”

**—नवा काळ,** मुंबई ( २२-१०-४७ )

“ मागें श्री. जांभेकर यांनीं ‘ लोकशिक्षण ’ नांवाचें असेंच एक मासिक काढलें होतें. तें त्यांनीं बरेंच ध्येयनिष्ठेनें व पदरास खार लावून चालविलें. पण तें थोडें रूक्ष होतें. लोकशिक्षणाचा उच्च दर्जा ‘ नवभारतां ’ त असूनहि त्याचा रूक्षपणा नाहीं हा याचा विशेष आहे. ......

**—नवशक्ति,** मुंबई ( २१-११-४७ )

“ It is a forum where any one may come and air his views on any question concerning the social well being and cultural progress of our people. We heartily welcome this new magazine.”......

**Bharat-Jyoti,** Bombay, (7-12-47)

“ आजवर या मासिकाचे सहा अंक प्रसिद्ध झाले. या कालांत महाराष्ट्रांत एकदम बरींच मासिकें सुरू झालीं आहेत आणि प्रत्येकाचें कांहीं तरी वैशिष्ट्य आहेच. पण ‘ नवभारता’चें जें वैशिष्ट्य आहे तें उल्लेखनीय आहे. प्रचलित राजकीय, आर्थिक, सामाजिक, ऐतिहासिक, वाङ्मयात्मक वगैरे सर्व विषयांची तात्त्विक व शास्त्रीय बाजू या मासिकांत अधिकारी लेखकांकडून लिहिलेली वाचावयास मिळते.”...

**—लोकमान्य,** मुंबई ( १०-३-४८ )

“ हें मासिक महाराष्ट्रांतील थोर विद्वानांच्या विद्वत्तेचें व व्यासंगाचें आल्हाददायक नवनीत आहे असें म्हणणें बिलकुल अतिशयोक्तीचें नाहीं.... ... ... आम्हांस तर असें वाटतें कीं ज्यांच्या वाचनांत हें मासिक नाहीं तो काळाच्या मागें पडल्यावांचून रहाणार नाहीं. ... ... या मासिकांतील वाङ्मयाचें अन्न थोडें जड वाटलें तरी पौष्टिक आहे. सबंध महिनाभर एकएका अंकांतलि लेख सावकाशपणें चर्वण करावें अशा योग्यतेचें हें मासिक आहे. ” ......

**—स्वतंत्र भारत,** धुळें (२५-५-४८)

# आ म चीं न वीं प्र का श नें

## जिवंत व्रतोत्सव

( सुधारून वाढविलेली द्वितीयावृत्ति )

लेखक : आचार्य काकासाहेब कालेलकर

अनुवादक : भाऊ धर्माधिकारी

आपल्या लोकजीवनांत असणाऱ्या सणांचें आणि उत्सवांचें स्वरूप ओळखून लोकशिक्षक आचार्य काकासाहेब कालेलकर यांनीं या पुस्तकांत जुन्या उत्सव-सणांचें पुनरुज्जीवन नव्या काळाला अनुसरून केलें आहे. त्याचप्रमाणें अद्ययावत् अशा अगदीं नवीन उत्सव-सणांचीहि भर त्यांनीं त्यांत घातली आहे. विद्यार्थी आणि शिक्षक यांना अत्यंत उपयुक्त.

पृष्ठें २६० मूल्य ३॥ रुपये

## हिंदुधर्माचीं मूलतत्त्वें आणि पुनर्घटना

( सुधारलेली द्वितीयावृत्ति )

लेखक : डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन्

अनुवादक : बाळूभाई मेहता

भारताचे त्रिखंडकीर्ति पंडित डॉ. राधाकृष्णन् यांच्या ' Hindu View of Life ' या ग्रंथाचा सुबोध अनुवाद. युरोपीय श्रोतृवृंदापुढें दिलेल्या या चार व्याख्यानांमधून डॉ. राधाकृष्णन् यांनीं हिंदुधर्माच्या तत्त्वज्ञानाचें आविष्करण सोपपत्तिक रीतीनें केलें असून त्यामधील उणीवा भरून काढण्याचा योग्य मार्ग दाखविला आहे. युरोपीय विद्वानांत हा ग्रंथ अत्यंत मान्यता पावला असून हिंदुधर्माचें यथातथ्य स्वरूप समजावून घेण्याला यासारखें दुसरें साधन नाहीं.

पृष्ठें १४४ मूल्य २॥ रुपये

## प्र वा सी

लेखक : महाकवि खलिल जिब्रान

अनुवादक : रघुनाथ गणेश जोशी

' जीवन-दर्शन ' ( Prophet ) काराच्या लेखणींतून उतरलेलें हृदयंगम पुस्तक. या पुस्तकांत जीवन-सत्याच्या शोधार्थ अखिल विश्वांत परिभ्रमण करणाऱ्या प्रवाशानें सांगितलेल्या एकावन्न कथा ग्रथित करण्यांत आल्या आहेत. प्रवास-मार्गावरील धूलि आणि तितिक्षा यांनींच या कथांची गुंफण झाली असल्यामुळें वाचकांस त्या बहुमोल वाटतील, यांत शंका नाहीं.

पृष्ठें १२० मूल्य २ रुपये

**सु ल भ रा ष्ट्री य ग्रं थ मा ला, पुणें २**







अनुक्रमणिका